गोविन्द केशव भट .

*

# ऊरुभङ्ग
# आणि
# इतर नाटकें

*

मॉडर्न बुकडेपो प्रकाशन

प्रकाशक :
**श्री. कमलाबाई भिडे**
मालक मॉडर्न बुकडेपो,
बाजीराव रस्ता, पुणें २.

*



प्रथमावृत्ति :
विजयादशमी,
११ ऑक्टोबर, १९५९

किंमत
**दीड रुपया**

*

मुद्रक :
**चिं. ग. वझे**
साधना प्रेस
४३०/३१ शनवार, पुणें २.

# आमुख

महाभारतांतील कथानकांवर भासानें सहा नाटकें लिहिलेलीं आहेत. त्यांपैकीं ‘ पञ्चरात्र ’ सोडलें तर बाकीचीं पांचहि एकांकी नाटकें आहेत.

प्राचीन कवींच्या पद्धतीप्रमाणें भासानें आपलीं कथानकें इतिहास, पुराण, आख्यायिका यांच्यामधून निवडलेलीं असलीं तरी, त्यांना नाट्यरूप देतांना जी स्वतंत्र प्रज्ञा प्रकट झालेली दिसते, तें भासाचें एक खास वैशिष्ट्य म्हणावें लागेल. ही स्वतंत्र प्रज्ञा केवळ नाट्यरचनेंतच दिसतें असें नसून, मूळ आधारावर नव्या कथावस्तूचा डोलारा उभारण्याच्या भासाच्या कल्पकतेंतहि आहे. याचा प्रत्यय, ‘ पञ्चरात्र ’, ‘ मध्यमव्यायोग ’ आणि ‘ दूतघटोत्कच ’ या नाटकांत आढळेल.

हिडम्ब राक्षसाचा वध, हिडिम्बा आणि भीम यांचा विवाह आणि घटोत्कचाचा जन्म या घटना महाभारतामध्यें आहेत. परंतु अज्ञातवासाच्या कालांत एका विलक्षण योगायोगानें भीम आणि हिडिम्बा यांचें पुनर्मीलन होतें, ही **‘मध्यमव्यायोग’** नाटकांतील कल्पना केवळ भासाचीच. या पुनर्मीलनाचा घाट जमविण्यासाठीं एका ब्राह्मणकुटुंबाचें उपकथानक भासानें जोडलें आहे; आणि त्याचा नाट्यदृष्ट्या उपयोग भीम आणि घटोत्कच यांची भेट, द्वंद्व-युद्ध आणि शेवटीं भीम आणि हिडिम्बा यांचें मीलन होण्यांत केला आहे. उपकथानकाची कल्पना ऐतरेय ब्राह्मणांतील शुनःशेपाच्या कथेवरून किंवा महाभारतांतील बकवधाच्या प्रसंगावरून सुचलेली असणें शक्य आहे. परंतु या उपकथानकाची रचना आणि

विशेषतः भीमघटोत्कच यांची भेट साध्य करण्यासाठीं त्याची जी योजना येथें केली आहे त्यांत नावीन्य आहे यांत शंकाच नाहीं. याशिवाय, घटोत्कच आणि हिडिम्बा यांच्या स्वभाव-लेखनांतील बदल कथावस्तूच्या दृष्टीनें जितका औचित्यपूर्ण तितकाच नाट्यदृष्ट्याहि परिणामकारक म्हटला पाहिजे.

'व्यायोग' म्हणजे प्रख्यात नायक असलेलें, अनेक पुरुष-पात्रें व अल्प स्त्रीपात्रें असलेलें, युद्ध आणि द्वंद्वयुद्ध यांनीं भरलेलें, वीररसात्मक एकांकी नाटक. 'मध्यमव्यायोग' हें एकांकी नाटक अनेक दृष्टींनीं वैशिष्ट्यपूर्ण आहे. इतर एकांकिकां-मध्यें कुठें भरतवाक्य नाहीं म्हणून, तर कुठें दूतनाटकांतील कथावस्तूप्रमाणें कथानक अपुरें वाटतें म्हणून, या स्वयंपूर्ण एकांकिका नाहींत, असें मत कांहीं विद्वानांनीं प्रतिपादिलें आहे. परंतु 'मध्यमव्यायोग' ही स्वयंपूर्ण एकांकिका पाहिली म्हणजे, महाभारताच्या आधारें अशीं स्वतंत्र एकांकी नाटकें रचण्याची भासाची कल्पना असली पाहिजे असें स्पष्ट दिसतें. तेव्हां, दूत—नाटकांत सकृद्दर्शनीं दिसणारा अपुरेपणा रचनेचा नसून कथावस्तूचाच आहे, आणि त्यामुळें, किंवा भरतवाक्यासारखी तांत्रिक बाब नसल्यामुळें, एकांकिकेच्या स्वयंपूर्णतेला बाध येण्यासारखा नाहीं, असेंच मानणें योग्य होईल.

'मध्यमव्यायोग' नाटकांत मुख्य वीररस असला तरी, ब्राह्मण कुटुंबाच्या दयनीय अवस्थेंत करुण व भयानक आणि भीम-घटोत्कचांच्या द्वंद्वांत वीर, रौद्र, अद्भुत या रसांचाहि परिपोष झालेला आहे. शिवाय, भीम-घटोत्कचांच्या प्रवेशांत जें नाट्य-छलित ( dramatic irony ) आहे, त्यांत जशी अद्भुताची तशी हास्याचीहि छटा आहे. या एकांकिकेंतील उपकथानक

आणि मुख्य कथानक यांचा सांधा बिनचूक जुळलेला आहे. सर्व प्रसंग जवळ-जवळ एकाच पार्श्वभूमीवर घडलेले आहेत. आणि कथानकाचा काळ सकाळपासून मध्याह्नापर्यंत सुमारें दोन-तीन तासांचाच आहे. म्हणजे कथावस्तु, स्थल आणि काल यांची एकताहि या स्वतंत्र, स्वयंपूर्ण एकांकिकेंत भासानें साधली आहे हें दिसून येईल.



द्यूतप्रसंगानें द्रौपदीची भर राजसभेंत विटंबना झाली. त्या अपमानांतून पुढें भारतीय युद्धाचा वणवा पेटला. अज्ञातवासाची अट पुरी केल्यावर पांडवांनीं आपल्या वांटणीच्या राज्यासाठीं दुर्योधनाकडे मागणी केली. दुर्योधनानें तिचा अव्हेर केला आणि त्यामुळें युद्ध अटळ झालें. या वेळीं पांडवांची मागणी सादर करण्यासाठी आणि आपलें वैयक्तिक वजन खर्च करून युद्धापायीं होणारा संहार टाळावा, ह्या उद्देशानें स्वतः श्रीकृष्णानें दूताची भूमिका घेऊन शिष्टाई केली. ह्या सुपरिचित प्रसंगावर '**दूतवाक्य**' ही एकांकिका भासानें रचलेली आहे.

कथानकाला नाट्याचा साज चढवितांना कांहीं फेरफार अवश्य असतातच. परंतु एक विशिष्ट नाट्यपरिणाम साधण्या-साठीच भासानें कांहीं विशेष बदल केलेले आहेत. नाटकाचा गाभा, दुर्योधन आणि श्रीकृष्ण यांच्या चढया संवादानें भरलेला आहे. या दोन पात्रांवरच सर्व नाट्यवस्तु केंद्रित करण्यासाठीं इतर अनेक पात्रांची उपस्थिति केवळ निर्देश करून सुचाविली आहे. धृतराष्ट्र राजसभेंत सुरुवातीला हजर नसल्याचें दाखवून सभेचें नेतेपद अनायासें दुर्योधनाकडे दिलें आहे. त्यामुळें

श्रीकृष्णाला साक्षात् दुर्योधनाशींच सर्व बोलणें करावें लागतें. या संवादांतूनच सर्व नाट्य आकारास येतें.

या रचनेमुळें दुर्योधन आणि श्रीकृष्ण यांच्या व्यक्तिमत्वाचे धारदार आणि तेजस्वी पैलू उत्कटपणें प्रत्ययाला येतात. दुर्योधन हा मानी, हेकट, जिद्दी आणि दुष्टहि आहे. पण त्याचबरोबर त्याची जी क्षात्र-वृत्ति दिसून येते तिचें तेजदेखील अपूर्व आहे. सर्व राजसभेला आपल्या शब्दाप्रमाणें नाचवून दुर्योधन प्रत्यक्ष श्रीकृष्णासमोर आपला गर्वोद्धत दावा चालवायला मुळींसुद्धां कचरत नाहीं. त्याच्या अहंकारांत सम्राटाचा तोरा आहे, आत्मविश्वासाचा बेडरपणा आहे. त्यानें पांडवांचा आणि श्रीकृष्णाचा केलेला उपहास आणि विशेषतः 'राजपदाची प्राप्ति म्हणजे भिकेची मागणी नव्हे' हे त्याचे टाशीव उद्‌गार अविस्मरणीय आहेत.

श्रीकृष्णानें दूताची भूमिका करतांना राजकारणाचे आणि माणुसकीच्या व्यवहाराचे सर्व पवित्रे दाखविले आहेत. शेवटीं मात्र सर्व उपाय हरल्यावर दैवी शक्तीचा चमत्कार दाखविला आहे. विश्वरूपाचें दर्शन आणि सुदर्शनादि दैवी आयुधांचें आगमन हा अद्‌भुत भाग या एकांकिकेच्या रचनेचा एक महत्त्वाचा विशेष आहे. या अद्‌भुताच्या दर्शनानें कुरुवंशाच्या नाशाची सूचना स्पष्ट करण्याचा उद्देश साधलेला आहे. श्रीकृष्णानें दुर्योधनाला प्रत्यक्ष बोलून जें सांगितलें त्याचें, म्हणजे दूतवाक्याचें, आगामी अनर्थाचें, दृश्यात्मक प्रत्यंतर नाटकाच्या शेवटच्या भागांतील अद्‌भुताच्या योजनेनें घडविलें आहे. भारतीय युद्धाला निमित्त-भूत झालेला द्यूतप्रसंग नाटकाच्या सुरुवातीला चित्रपटाची योजना करून पार्श्वभूमीदाखल जसा रंगविला आहे, त्याच-

प्रमाणें आगामी संहाराचें चित्र अद्‌भुत दृश्याच्या रूपानें उभें केलें आहे.

या एकांकिकेच्या रचनेंत दृश्यात्मकतेचा वांटा ( Spectacular aspect ) फार मोटा आहे. वास्तविक, येथील रंगस्थल म्हणजे दुर्योधनाची मंत्रशाला. कौरवपक्षीय वीर आणि राजे येथें उपस्थित आहेत. परंतु या रचनेची कल्पना देण्यापुरता 'कांचुकीय' या पात्राचा उपयोग केला आहे; बाकी मंत्रणेचें सारें काम दुर्योधनाच्या भाषणांतूनच केवळ साधलें आहे. शेवटींहि एकट्या सुदर्शनाच्या भाषणानेंच आयुधांच्या आगमन-निर्गमनाचें दृश्य सूचित केलें आहे. असंख्य पात्रें रंगभूमीवर असूनहि बोलणारीं पात्रें मात्र दोन-चारच आहेत. रचनेची ही विशिष्टता लक्षणीय आहे. साहजिकच, एवढ्यासाठीं दीर्घ एक-मुखी भाषणांची योजना जरी भासाला करावी लागली, तरी दृश्यात्मक परिणामाच्या भव्य कोंदणांत चमकणाऱ्या संवादाचें तेज प्रकर्षानें प्रकट झालें आहे, असें दिसून येईल.



भारतीय युद्धाचा वणवा पेटण्यापूर्वी कौरव-पांडवांच्या मधलें वैर सामोपचारानें मिटलें तर पाहावें म्हणून श्रीकृष्णानें मनःपूर्वक प्रयत्न केला. कृष्णशिष्टाईचा हा भाग 'दूतवाक्य' या एकांकी नाटकांत आला आहे. युद्धाला सुरुवात झाल्यानंतर मात्र अंत येईपर्यंत युद्ध चालू होतें. मध्यंतरीं शिष्टाईचें बोलणें करण्याचा कुठें प्रश्नच आलेला नव्हता. परंतु भासानें असा प्रसंग आपल्या कल्पनेनें उभा केला आहे. युद्धांत अभिमन्यु पडला; पुत्रनिधनानें शोकाकुल होऊन सूर्यास्ताच्या आंत जय-

द्रथाचा वध करण्याची भीषण प्रतिज्ञा अर्जुनानें केली. या अवधींत दुःखभरानें आणि अनर्थांची अनिवार्य परंपरा आतां तरी थांबवावी या बुद्धीनें, श्रीकृष्णानें घटोत्कचाबरोबर संदेश देऊन त्याला धृतराष्ट्राकडे पाठविलें अशी कल्पना भासानें करून त्यावर '**दूतघटोत्कच**' या एकांकिकेची उभारणी केली आहे.

या दोन दूतनाटकांची पार्श्वभूमि जशी भिन्न आहे, तशी त्यांच्या स्वरूपांतहि साहजिकच भिन्नता आहे. 'दूतवाक्य' नाटकाचा प्रसंग कौरवांच्या मंत्रशालेंत घडतो. या वेळीं द्रोणाचार्य, भीष्मपितामह इत्यादि वयोवृद्ध माणसें आणि कौरवपक्षीय राजे सभास्थानीं हजर आहेत. प्रसंगांतील उत्कटता साधण्यासाठीं सर्व व्यक्तींना पार्श्वभूमींतच ठेवून भासानें दुर्योधनाच्या स्वभाव-रेखेवर मुख्य लक्ष केंद्रित केलें आहे; आणि द्रौपदीवस्त्रहरणाचा प्रसंग चित्रपटाच्या रूपानें सुरुवातीला योजून एकीकडे उत्कटतेला धार आणली आहे, तर दुसरीकडे भावी अनर्थ अटळ असल्याची गंभीर सूचना दिलेली आहे. शिवाय, दूताच्या भूमिकेंत श्रीकृष्णच असल्यानें व श्रीकृष्णाचें देवपण गृहीत धरल्यानें या नाटकांत अद्‌भुताचा अंशहि फार मोठ्या प्रमाणा-वर आलेला आहे. या अद्‌भुताच्या दर्शनानें कौरवांच्या मुजोर-पणाची विफलता पटून, शेवट काय होणार आहे याचें सूचक चित्रहि नजरेसमोर उभें रहातें. दुर्योधन, श्रीकृष्ण आणि पुढें सुदर्शन एवढ्याच व्यक्तिरेखा ठळकपणें रंगवून भासानें संवादां-तील संघर्ष आणि त्याची अटळ अखेर, एवढ्यांवर नाट्यपरिणाम साधला आहे.

उलट, अभिमन्यूचें निधन आणि पुढील जयद्रथाचा वध या दोन टोंकांत 'दूतघटोत्कच' या नाटकाचा प्रसंग कल्पिलेला

असल्यामुळें कारुण्याच्या पार्श्वभूमीवर वास्तव दर्शनाचें चित्र खुलून उठलें आहे. अभिमन्यूच्या वधाची शोकात्मक प्रतिक्रिया अर्जुनाच्या दु:खांतच नव्हे, तर श्रीकृष्णानें धृतराष्ट्राला पाठविलेल्या संदेशांतहि प्रकट झाली आहे. कौरवांच्या बाबतींत निदान धृतराष्ट्रापुरती तरी ही प्रतिक्रिया शोकाची आहे आणि त्यापाठोपाठ येणाऱ्या भयाची आहे. उत्तरेला वैधव्य आणणाऱ्यानें स्वत:च्या बायकोवरहि वैधव्याचा प्रसंग ओढवून घेतला आहे, असें दु:शला सहजीं बोलून जाते. या उद्‌गारांतील भीषण सत्य त्या क्षणीं कळलें नाहीं तरी तें कळायला वेळ लागत नाहीं. धृतराष्ट्राच्या हृदयांत घोर अंधार भरून जातो. दारुण निराशेनें त्याला पुढचा अनर्थ नुसता अटळ वाटतो एवढेंच नसून त्या अनर्थाचें स्पष्ट चित्र त्याच्या आंधळ्या डोळ्यांसमोरहि स्पष्ट उभें रहातें. अभिमन्यूच्या उत्तरक्रियेबरोबर आपल्या पुत्रांची उत्तरक्रिया उरकून घ्यावी असें वाटण्याइतका अगतिक शोक त्याला झालेला आहे. ज्ञातिकुलांत माजलेलें हें वैर पोराबाळांपर्यंत येऊन पोंचलें. या दाहक जाणिवेचें भय धृतराष्ट्राच्या उरांत दाटलेलें आहे. श्रीकृष्णाच्या संदेशांत या भयाचें सूचन आहे. पण धृतराष्ट्र अगतिक आहे; ज्या खंबीरपणाची अपेक्षा त्याच्याकडून श्रीकृष्णानें केली आहे तो खंबीरपणा दुर्योधनासमोर दाखविण्याइतकी शक्ति धृतराष्ट्राच्या अंगीं नाहीं.

या करुण विफलतेचे रंग सुरुवातीला आल्यानें दुर्योधनाचा उद्दामपणा विरोधानें अधिकच खुलून दिसतो. दुर्योधन उद्दाम आहे, हट्टी आहे; परंतु क्षात्रवृत्तीचा निर्भयपणाहि त्याच्या अंगीं पुरेपूर आहे. अभिमन्यूच्या वधानें पांडवांच्या मर्मावरच

आघात केल्याचें समाधान त्याला आहे. अर्जुनाच्या प्रतिज्ञेनें त्याला आनंद होतो. कारण, जयद्रथाचें संरक्षण सहजीं करूं असा त्याला आत्मविश्वास आहे; आणि त्यामुळें विफलप्रतिज्ञ अर्जुनानें चितारोहण केल्याचें चित्र मनासमोर उभें करून तो हर्षानें नाचतो. श्रीकृष्णाच्या संदेशाचें व त्यांतील धमकीचेंहि त्याला हंसूं येतें ! दुर्योधनाच्या या प्रतिक्रियेंत उद्दाम बेछूटपणा असला तरी त्यामागें स्वतःच्या सामर्थ्याचा प्रत्यय आहे, कौरव-पक्षीय वीरांच्या पराक्रमाचा विश्वास आहे. म्हणूनच्च घटोत्कचाला उत्तर देतांना तो त्याला तुच्छतेनें रवाना करतो आणि श्रीकृष्णाला, युद्धभूमीवर तुला बाणांनीं उत्तर देईन, असा वीराला शोभणारा निर्भय संदेश पाठवतो.

घटोत्कचाची भूमिका श्रीकृष्णापेक्षां वेगळी आहे. तो एक पोर आहे; बोलण्याचे डावपेंच त्याला अवगत नाहींत; श्रीकृष्णा-प्रमाणें दैवी शक्तिहि त्याच्या पाठीशीं नाहीं. परंतु त्यामुळें त्याच्या स्वाभाविक वृत्तीचे रंग जिवंतपणें प्रकट झाले आहेत. घटोत्कचाचें बेडर धैर्य, स्पष्टवक्तेपणा आणि सरळ, निष्कपटी स्वभाव यांना तोड नाहीं. श्रीकृष्णाविषयींची त्याची भक्ति जशी निर्विवाद आहे, तसा अर्जुनकाकांच्या पराक्रमाबद्दल त्याला वाटणारा विश्वासहि संशयातीत आहे. अंगांत राक्षसाचें रक्त असलें तरी तो सहृदयतेला आणि सभ्यतेला पारखा नाहीं. धृतराष्ट्राचा मान राखून तो त्याला उपचारपूर्वक अभिवादन करतो. धृतराष्ट्रानें अभिमन्यूबद्दल दुःख प्रकट करतांच त्याचें अंतःकरण विरघळतें, आणि धृतराष्ट्र किती चांगला आहे, असें तो बोलून दाखवतो. श्रीकृष्णाच्या संदेशांत अर्जुनाच्या शोकाचें वर्णन आहे; तें ऐकून दुर्योधन वगैरे हंसूं लागतात; तें पाहून

किंचित् वरमून तो पांडवांची तरफदारी करतो आणि शोकाघातानें पराक्रमी पुरुषांचें हृदयहि खचून जातें असें सुचवितो. अर्थात् कौरव दुष्ट आहेत, त्यांना शत्रु म्हणूनच वागविलें पाहिजे, याविषयीं घटोत्कचाच्या मनांत मुळींच शंका नाहीं. श्रीकृष्णांनीं पाठवणी केली नसती तर त्यानें कौरवांचें तोंड युद्धभूमीवरच पाहिलें असतें ! म्हणूनच शब्दानें शब्द वाढतांच घटोत्कचाचा निर्भय स्पष्टवक्तेपणा एकदम प्रकट होतो. शकुनीला त्यानें दिलेला टोमणा आणि, प्रत्यक्ष भावांशीं क्रूरपणानें वागणारे कौरव राक्षसांनाहि लाजवतील, अशा आशयाचे दुर्योधनाला त्यानें सुनावलेले उद्गार जितके तेजस्वी तितकेच अविस्मरणीय आहेत.

या एकांकिकेंत धृतराष्ट्र, दुःशला, दुर्योधन, घटोत्कच अशा अनेक व्यक्तिरेखा भासानें जिवंत केल्या आहेत, आणि करुणरसाची वीररसाशीं सांगड घालून खळबळ उडवून देणारें नाट्य निर्माण केलें आहे. या चित्रांतील वास्तवतेचे रंग, आणि हा सर्व प्रसंग भासानें केवळ आपल्या कल्पकतेनें उभा केला आहे ही वस्तुस्थिति —या सर्व गोष्टी लक्षांत घेतल्या म्हणजे भासाच्या नाट्यसामर्थ्याचा प्रत्यय आल्याशिवाय रहात नाहीं.



संस्कृत नाट्यवाङ्मयांत शोकांतिका हा नाट्यप्रकार नाहीं. संस्कृत नाटकांत शोकरस अर्थात् भरपूर प्रमाणांत आढळून येतो. किंबहुना, वाचक-प्रेक्षकांच्या भावना गदगदून हलविण्याचें एक हुकमी साधन म्हणून शोकरसाची योजना संस्कृत नाटककारांनीं साक्षेपानें केलेली आहे. परंतु सबंध नाटकाला शोकांतिकेचें रूप यावें यासाठीं ज्या विशिष्ट तऱ्हेची

नाट्यरचना, कथावस्तूची मांडणी आणि पात्रालेखन इत्यादि गोष्टी पाहिजे असतात, त्या मात्र त्यांनीं योजिलेल्या नाहींत. या वस्तुस्थितीला अपवादरूप अशा भासाच्या 'कर्णभार' आणि '**ऊरुभङ्ग**' या दोन एकांकिका काय त्या दाखविण्या-सारख्या आहेत.

'ऊरुभङ्गा' ची रचना भासानें हेतुपुरस्सर केलेली दिसते. संस्कृत नाटकांत लढाई, द्वंद्वयुद्ध यांसारखे भीषण प्रसंग प्रत्यक्ष दाखविण्याची मनाई आहे. भास ही वर्ज्यावर्ज्यता पाळीत नाहीं. असें असूनहि भीम-दुर्योधनांच्या गदायुद्धाचा प्रसंग त्यानें तीन सैनिकांच्या निवेदनाद्वारें रंगविला आहे. याचें कारण 'ऊरुभङ्गा' च्या प्रत्यक्ष प्रसंगांतील थरारक प्रक्षोभक नाट्यापेक्षां दुर्योधनाच्या जीवनांतील करुण नाट्यच त्याला मुख्यतः चित्रित करावयाचें होतें, हेंच असावें. ऊरुभङ्गाचें बाह्य जड दृश्य सजविण्यापेक्षां दुर्योधनाच्या जिवंत अंतरंगावर प्रकाश पाडण्यानें मानव्याचें दर्शन अधिक गाढपणें प्रतीत होईल, यांत शंका नाहीं. म्हणून भासानें सर्व कथावस्तूची मांडणी दुर्योधनाभोंवतीं केली. गदायुद्धाचें निवेदन संपून प्रत्यक्ष मुख्य दृश्याला सुरुवात होते तेव्हां मांड्या चिरडून रक्तानें माखलेला घायाळ दुर्योधन खुरडत खुरडत रंगभूमीवर प्रवेश करतांना दिसतो. प्रेक्षकांचें लक्ष दुर्योधनावर खिळतें आणि नाटकाचा शेवट होईपर्यंत तें तसेंच रहातें. दुर्योधना-विषयीं सहानुभूतीचा उमाळा येतो, आणि ही सहानुभूति शेवटपर्यंत अशीच टिकून रहाते.

कारण, भासाचा दुर्योधन वेगळा आहे. महाभारतांतल्या दुर्योधनाप्रमाणें तो दुष्ट, कपटी, मग्रूर आणि मदांध असा नाहीं.

म्हणूनच गदायुद्धांत दुर्योधनाचें पतन झाल्यावर एका दुष्टाचें निर्दालन झाल्याचें सात्त्विक समाधान जें महाभारतांत मिळण्याचा संभव आहे, तें ' ऊरुभङ्गांत ' मिळणें शक्य नाहीं. भीम अधिक बलवान् असला तरी दुर्योधनाचें युद्धकौशल्य निर्विवाद आहे; आणि याचा प्रत्यय द्वंद्वयुद्धांत आल्यावांचून रहात नाही. इतकेंच नव्हे तर, कृष्णाच्या प्रेरणेनें भीमानें कपटाचा आश्रय केला नसता तर दुर्योधनासारख्या निष्णात योद्ध्याला सरळ जिंकणें अशक्यच होतें, असें आपल्याला पटतें. दुर्योधनाविषयीं जी गाढ सहानुभूति आपल्याला वाटते, त्याचें मूळ इथें आहे.

या ' वेगळ्या ' दुर्योधनाच्या जीवनाचे अंतिम क्षण हा ' ऊरुभङ्गा ' चा खरा नाट्यविषय. हे क्षण अतिशय बोलके आहेत. त्यांत दुर्योधनाच्या जीवनांतील कारुण्याबरोबरच त्याच्या स्वभावांतील उदात्तताहि भराला आली आहे. गुरुजनांविषयीं नितान्त आदर बाळगणारा; मांड्या गेल्याच्या शारीरिक दुःखापेक्षां पायांशीं लवून वंदन करण्याची शक्यता आतां उरली नाहीं या जाणिवेनें विह्वल झालेला; आणि पुढील जन्मीं त्याच मातेच्या कुशींत जन्म घेण्याचा हळवा आग्रह धरणारा पुत्र.... आपल्या असूर्यंपश्या अशा स्त्रिया रणांगणावर उघड्या माथ्यानें येऊन आपल्यासाठीं शोक करीत असलेल्या पाहून ज्याच्या हृदयाला चरका बसला असा मानी पति....आणि पुत्रवात्सल्यानें ज्याचें हृदय अक्षरशः विरघळलें आणि पुत्राचें हक्कानें बसण्याचें आसन अशा मांड्या नाहीशा झाल्यामुळें रणभूमीवरच्या जख-मांची वेदना ज्याच्या हृदयांत सहस्रधारांनीं उफाळून आली असा प्रेमळ पिता...हें दुर्योधनाचें दर्शन नवें आहे. त्यांतील कारुण्याच्या अश्रुबिंदूंवर उदात्ततेचें इंद्रधनुष्य चमकत आहे.

या अंतिम क्षणीं दुर्योधनाचें मन आरशासारखें स्वच्छ झालें आहे. आपल्या घातक कृतींचा अर्थ त्याला समजून आला आहे. वैराची आणि युद्धाची निष्फळता त्याला जाणवली आहे. बलरामाला आणि अश्वत्थाम्यालासुद्धां आपल्या मृत्यूचा बदला घेण्याच्या इच्छेपासून तो प्रामाणिकपणें परावृत्त करीत आहे. दुर्जयाला त्यानें केलेल्या उपदेशांत वैर नाहीं, सूडाची भावना नाहीं, अप्रामाणिकपणाहि नाहीं. उलट, एक विशाल जाणीव आहे.

दुर्योधनाला खरोखरींचा पश्चात्ताप झालेला आहे. मात्र हा पश्चाताप निष्फळतेंतून, रितेपणामधून जन्माला आलेला नाहीं, हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. तसा असता तर, दुर्योधनाचें चारित्र्य आणि एखाद्या सामान्य माणसाचें जीवन यांत कांहीं भेद उरला नसता. ज़ीवनाचा विशाल अर्थ उमजून मानवी नियतीची प्रचंड शक्ति जाणवली म्हणजे वैर, मत्सर, सूड इत्यादि मानवी विकार कसे भुसभुशीत, निरर्थक आहेत, हें कळायला लागतें. जीवनाच्या उंचसखल प्रांगणांत ज्या गोष्टींचा अर्थ कधीं लागलेला नसतो त्या गोष्टी मृत्यूच्या दरींत शिरतांना समजायला लागतात! दुर्योधनाचा पश्चात्ताप या जाणिवेंतून अवतरला आहे. या नव्या जाणिवेनें दुर्योधनाचें मन धुवून निघालें आहे. म्हणूनच आपल्याला मरण आलें तें भीमाच्या हातून आलें, हा लौकिक समज त्याला उथळ वाटतो. आपला मृत्यु ही जगन्नियंत्याची घटना! त्यांत बदला कशाचा घ्यायचा? शोक कशाचा करायचा? मात्र या साऱ्या अनर्थांचें मूळ जो अभिमान, तो दुर्योधनाचा प्राकृतिक अटळ धर्म आहे. 'राजे मुळीं अभिमानानेंच घडवले आहेत' असें तो अश्वत्थाम्याला सांगतो. या अभिमानानें ओढवलेल्या अनर्थपरंपरेची जाणीव त्याला या अंतिम क्षणीं

झालेली आहे. अर्थात्, जें झालें त्याला इलाज नाहीं. तें अपरिहार्य आहे. म्हणूनच दुर्योधनासारखा मानी राजा ज्या अभिमानानें मान ताठ ठेवून जगला त्याच अभिमानानें मन शांत आणि स्वच्छ करून तो स्वर्गाला जात आहे. या अपरिहार्यतेंत दुर्योधनाच्या जीवनाची शोकान्तिका सामावलेली आहे. नव्या जाणिवेनें उजळलेल्या त्याच्या मनोदर्शनांत जीवनाचा उदात्त अर्थ आहे. म्हणूनच 'ऊरुभङ्ग' या एकांकिकेला करुणोदात्त नाट्याचें, स्वयंपूर्ण शोकान्तिकेचें रूप प्राप्त झालें आहे.



'**कर्णभार**' ही आकारानें सर्वांत छोटी एकांकिका. परंतु तिचा दर्जा मोठा आहे. येथेंहि भासानें कर्णाच्या व्यक्तिचित्रणाभोंवतीं नाट्यरचनेचे सारे रंग गोळा केले आहेत. वस्तुतः कवच-कुंडल-हरणाचा प्रसंग आणि कर्णार्जुनांचें युद्ध हे दोन्ही स्वतंत्र प्रसंग असून, महाभारताच्या कथेप्रमाणें त्यांच्यांत कालदृष्ट्याहि मोठें अन्तर आहे. परंतु भासानें ऐन युद्धभूमीवर, कर्ण अर्जुनाशीं युद्ध करायला रथांत बसून निघालेला असतांना, कवच-कुंडल-हरणाचा प्रसंग मध्यवर्ति दृश्यासारखा रंगविला आहे. आणि असें करण्यांत कर्णाच्या स्वभावांतील जो महान् गुण, आणि महान् दोषहि, म्हणजे त्याचें अमर्याद दातृत्व, त्यावर नेमकें बोट ठेवलें आहे. कर्णाच्या नाशाला अर्जुन निमित्त झालेला असला तरी कर्णाच्या या अजोड दातृत्वानेंच खरोखर त्याचा विनिपात घडवून आणलेला आहे. ब्राह्मणवेषधारी शक्राला संतुष्ट करण्याच्या प्रयत्नांत कर्णाच्या औदार्याला कसली मर्यादा म्हणून उरलेली नाहीं. कवच-कुंडलांच्या दानानें आपण आपल्या

प्राणांचें दान करतों आहों या जाणिवेपेक्षां, देवेन्द्राला कृतार्थ केल्याचा उन्मादी आनंदच कर्णाच्या हृदयांतून ओसंडत आहे! कर्णाच्या औदार्याचें हें दर्शन उदात्त आणि भव्य आहे. त्याची भव्यता आणखी वाढावी म्हणूनच कीं काय, भासानें शक्राला प्राकृतांत बोलायला लावून याचकाच्या हिणकस मनोवृत्तीच्या समोर कर्णाच्या उदार दातृत्वाचें लखलखणारें सुवर्ण मांडून ठेवलें आहे.

कर्णाच्या अतुलनीय व्यक्तिमत्वाचा हा गाभा म्हणजे शोकान्तिकेंतील नायकाचा उदात्ततेचा, भव्यतेचा गुण होय. या गुणाच्या चित्रणांत शोकान्तिकेचे सारे रंग भरलेले आहेत. या रंगांना वेगळा उजळा देण्यासाठीं, या छोट्या एकांकिकेंतहि रचनेचें कांही विशेष भासानें हेतुपूर्वक गुंफलेले आहेत. विषण्ण-तेनें भरलेल्या मनानें युद्धभूमीवर पडणारें कर्णाचें पाऊल ही या शोकान्तिकेची पूर्वसूचना परशुरामांच्या शापाचा प्रसंग उचलून त्याचा सांधा येथील कथावस्तूशी जोडण्यांत मुळांतील कारुण्याला विलक्षण धार आलेली आहे. परंतु कारुण्याचे रंग केवळ खुलवून कर्णाच्या शोकान्त जीवनाचें भव्यत्व संपूर्णतया प्रकट झालें नसतें. त्याला सहानुभूतीची जोड अवश्य होती. भासानें शल्याची व्यक्तिरेखा बदलली आहे; आणि त्याच्या अपार सहानुभूतीनें कर्णाच्या दुर्दैवाला आणि दुर्दैवी औदार्याला तोलून धरलें आहे. इतकेंच नव्हे तर इंद्रालाहि पश्चात्ताप झाल्याचें दाखवून कर्णाच्या जीवनांतील कारुण्याला स्निग्धतेची जोड मिळवून दिली आहे.

‘ कर्णभारां ’तील कारुण्य, सहानुभूति आणि उदात्तता यांचे रंग पाहिले म्हणजे, ‘ जिथें तो अर्जुन असेल तिथें माझा रथ

घेऊन जा ' या तीन ऐन मोक्याच्या वेळीं उच्चारलेल्या वाक्यांतील शोकान्त सूचकतेचें मर्म ध्यानीं येतें : युद्धभूमीवरील कर्णाचा हा रथांतील प्रवास म्हणजे जीवनाची अंतिम यात्रा होय ! या विनाशाच्या साऱ्या खुणा अगोदरच प्रकट झालेल्या आहेत आणि त्यांत जी कलात्मक सूचकता आहे ती ध्यानांत घेतली म्हणजे, अर्जुनाच्या बाणांनीं कर्णाचा प्रत्यक्ष अन्त दाखविण्यानें या नाजूक चित्रणाचा चुराडा झाला असता, असें वाटल्यावांचून रहाणार नाहीं. म्हणूनच, जिथें तो अर्जुन असेल तिथें कर्णाचा रथ चालला आहे, या सूचनेवरच भासानें कर्णाच्या जीवनावर पडदा पाडलेला आहे. ' ऊरुभङ्ग ' या एकांकिकेप्रमाणें, येथेंहि कर्णाच्या जीवनाचे भव्य आणि उदात्त अन्तिम क्षण भासानें साकार केले आहेत. ' ऊरुभङ्गां 'तलें बोलकें नाटय येथें नाहीं; परंतु यांतील कलात्मक सूचकता इतकी नाजूक आहे की ती जाणवायला हृदयाचेच कान आणि डोळे केले पाहिजेत.

भासाच्या या पांच एकांकिका सारख्या तोलाच्या आणि दर्जाच्या नाहींत, हें सांगावयास नकोच. परंतु त्या सर्वांमध्यें भासाच्या स्वतंत्र प्रज्ञेचा, तंत्रकुशलतेचा आणि प्रभावी, जिवंत नाटय निर्माण करणाऱ्या नाटयप्रतिभेचा साक्षात्कार वेगवेगळ्या रूपांमध्यें झाल्यावांचून रहाणार नाहीं.



# अनुक्रम





पूर्वप्रसिद्धि :

**मध्यमव्यायोग** : ( चित्रमयजगत्, डिसेंबर, १९५६ )
**दूतवाक्य** : ( साधना, दिवाळी अंक, १९५७ )
**दूतघटोत्कच** : ( सत्यकथा, जानेवारी, १९५८ )
**ऊरुभङ्ग** : ( साधना, दिवाळी अंक, १९५६ )
**कर्णभार** : ( सत्यकथा, जून, १९५६ )



प्रस्तुत अनुवादांत मूळ नाटकांमधील नान्दी, भरतवाक्य आणि प्रस्तावनेचा बहुतेक भाग गाळलेला आहे. ‘ ऊरुभङ्ग ’ या एकांकिकेंत मात्र सुरुवातीच्या विष्कंभकांतील आवश्यक तेवढा निवेदनाचा भाग हेतुपूर्वक ठेविला आहे.

संस्कृत नाटकांची शैली गद्यपद्यमिश्रित असते. अनुवादांत सरळ गद्यच योजिलें आहे. अनुवाद करतांना, मूळ संस्कृतांतील सामासिक रचना आणि विशेषणांचे वाक्यखंड मराठी भाषेच्या प्रकृतीला शोभण्यासारखे नसल्यामुळें ते सरळ करून घेतले आहेत. एरव्हीं मूळ नाटकाचा आधार कोठेंहि सोडला नाहीं; मुळांत पदरची भर घातलेली नाहीं; फक्त प्रसंग, कल्पना, संवादाचा ओघ इत्यादींचा अर्थबोध सुलभ व्हावा म्हणून अनेक रंगसूचना तेवढ्या स्वतःच्या घातल्या आहेत; त्या कंसांत दिल्या आहेत.

भासाच्या नाटकांना अनुवादाचा पेहराव चढवितांना मराठीची भाषिक प्रकृति सांभाळण्याचा मनःपूर्वक प्रयत्न केला आहे.



१



# मध्यमव्यायोग

## पात्रें

(प्रवेशानुक्रमानें)

केशवदास—एक वृद्ध ब्राह्मण

मोठा<br>
मधला (मध्यम)<br>
धाकटा<br>
} केशवदासाचे तीन पुत्र

ब्राह्मणी—केशवदासाची पत्नी

घटोत्कच

भीम

हिडिम्बा

**[ केशवदास, त्याची पत्नी ब्राह्मणी व त्याचे तीन पुत्र प्रवेश करतात. पाठोपाठ धीम्या गतीनें घटोत्कच प्रवेश करतो. वाघानें पाठलाग केल्यावर गायींची जशी त्रेधा उडेल, तसें सारें ब्राह्मण-कुटुंब भयग्रस्त झालेलें आहे. सुरुवातीचीं त्यांचीं भाषणें दबलेल्या आवाजांत चालतात. ]**

**केशवदास :** कोण बरें असावा हा? प्रभातीच्या सूर्य-किरणांप्रमाणें असलेले ह्याचे लाल-पिवळे केस वाऱ्यानें विखुरले आहेत. भुवया चढवल्यामुळें ह्याचे पिंगट मोठे डोळे चमकत आहेत. गळ्यांत सोन्याची साखळी घातल्यानें विजेनें लकाकणाऱ्या नीलमेघासारखा हा दिसतो आहे. युग-विलयाच्या वेळीं प्रकटणाऱ्या रुद्रशिवाप्रमाणें हुबेहूब ह्याची मूर्ति भासते आहे!

**मोठा पुत्र :** बाबा, हा कोण हो? दोन ग्रहगोलासारखे दिसणारे ह्याचे डोळे, पुष्ट आणि विशाल छाती, सोन्यासारखे पिवळेधमक केस, नेसलेला पीतांबर, अंधाराच्या ढिगाऱ्यासारखी कांति, आणि पुढे आलेले सफेत दांत—पोटांत चंद्राची कोर लपविणाऱ्या निळ्या जलमेघाप्रमाणें दिसतो आहे हा!

**मधला :** बाबा, कोण हो हा? हत्तीच्या सुळक्यासारखे ह्याचे दांत, नांगरासारखें नाक, हत्तीच्या सोंडेसारखे बाहू, नील-मेघाचा वर्ण आणि आहुतींनीं प्रज्वलित झालेल्या अग्नीची दीप्ति—हा समोर उभा राहिला म्हणजे त्रिपुरासुराच्या नगरांचें दहन करतांना उफाळलेला भगवान् शंकराचा भयंकर क्रोधच साकार झाल्यासारखें वाटतें!

**धाकटा :** बाबा, हा कोण आमचा छळ करतो आहे? महान

पर्वतावर होणारा वज्रपात, सर्व पक्ष्यांना हैराण करणारा ससाणा, पशूंच्या झुंडींना छळणारा सिंह,...कां पुरुषाचें रूप घेतलेला मृत्यूच ?

**ब्राह्मणी :** आर्य, हा कोण आम्हांला सतावतो आहे ?

**घटोत्कच :** ( पुढें होऊन ) ए ब्राह्मणा, उभा रहा, उभा राहा ! घाबरलेल्या बायकोपोरांचें रक्षण करण्याची शक्ति उरली नाहीं म्हणून माझ्या भीतीनें तुझें सारें धैर्यच गळालेलें दिसतें आहे. गरुडाच्या पंखांच्या टोकाचा वारा लागून भडकलेल्या क्रोधाग्नीची झळ लागलेला विव्हल साप सापिणीला घेऊन जसा पळ काढील तसा तूं कां पळतो आहेस ? ए ब्राह्मणा, जाऊं नकोस. खरेंच जाऊं नकोस !

**केशवदास :** ब्राह्मणी, भिऊं नकोस. मुलांनो, भिऊं नका ! याच्या वाणींत अविचार दिसत नाहीं.

**घटोत्कच :** ( स्वतःशीं बोलल्यासारखें ) अहो, केवढी दुःखाची गोष्ट ! ह्या पृथ्वीवर सर्व ठिकाणीं, सर्व काळीं महान् ब्राह्मणांचा अत्यंत आदर केला पाहिजे हें मला ठाऊक कां नाहीं ? परंतु आईची आज्ञा म्हणून हें अकार्य आज मला निःशंकपणें करायला हवें !

**केशवदास :** ( बाजूस ) ब्राह्मणी, त्या पूजनीय जलाक्लिन्न ऋषींचे शब्द आठवतात ना ? ते म्हणाले होते कीं, 'या वनांत राक्षस आहेत. तेव्हां जरा सावधगिरीनेंच प्रवास करा.' तें हें भय आपल्यासमोर आलें आहे !

**ब्राह्मणी :** आर्य, कशाचेंच कांहीं नाहीं असें बोलतां आहांत आपण !

**केशवदास** : नशीब माझें ! काय करूं मी ?

**ब्राह्मणी** : आपण आरडाओरडा केला तर ?

**मोठा** : आई, आरडाओरडीनें कोण येणार आपल्या मदतीला ? हें निर्जन वन आहे. अंधाराच्या ढिगाऱ्याप्रमाणें भासणाऱ्या पर्वतांच्या विविध रांगांनीं येथें दशदिशांमधील अंतर अवरुद्ध झालेलें आहे. वनमध्य पक्ष्यांनीं आणि श्वापदांनीं गजबजून गेलेला आहे. मनस्वी तापसांनाच फार तर तेथें राहायला आवडेल.

**केशवदास** : ( आठवून, धीरानें ) ब्राह्मणी, आतां भ्यायचें कांहीं कारण उरलें नाहीं. मनस्वी तापसाना राहायला आवडेल असें हें वन आहे, हें ऐकून माझी भीति जणूं नाहींशी झाली आहे. माझी कल्पना आहे कीं, पांडवांचा आश्रम येथून फार दूर नसला पाहिजे. आणि पांडव म्हणजे—त्यांना युद्धाचें प्रेमच आहे. शरण आलेल्यांना ममता दाखविणें हा त्यांचा स्वभाव आहे. दीनदुबळ्यांची कड ते नेहमीं घेतात. ते साहसी आहेत.... आणि ( घटोत्कचाकडे दृष्टिपात करीत ) आकृति आणि कृति यांनीं भय उत्पन्न करणाऱ्या अशासारख्याचें योग्य पारिपत्य करण्याची शक्ति पण त्यांच्याजवळ भरपूर आहे.

**मोठा** : पण बाबा, पांडव सध्यां इथें नाहींत असें मला वाटतें.

**केशवदास** : तुला काय ठाऊक ?

**मोठा** : वनांतून आलेल्या एका ब्राह्मणाकडून मी ऐकलें कीं शतकुंभ नांवाच्या यज्ञाचा सोहळा पाहण्यासाठीं ते धौम्य महर्षींच्या आश्रमाकडे गेले आहेत.

**केशवदास** : अरेरे! घात झाला!

**मोठा** : पण बाबा, सगळे पांडव कांहीं गेले नाहींत. आश्रमाचें रक्षण करण्यासाठीं मध्यम पांडवाला त्यांनीं इथेंच ठेवलें आहे.

**केशवदास** : ( सुटकेचा निःश्वास टाकून ) असें असेल तर सारे पांडव इथेंच आहेत असें म्हणायलाहि हरकत नाहीं.

**मोठा** : पण सकाळचा व्यायाम घेण्यासाठीं तो ह्या वेळीं इथून बराच दूर गेला आहे असें मी ऐकलें.

**केशवदास** : अरेरे! पुन्हां निराशा!! ( किंचित् थांबून ) असो! मुला, ह्याचीच विनवणी करून पाहातों.

**मोठा** : कशाला तसदी घेतां?

**केशवदास** : मुला, विनवणीला निराशेची पर्वा नसते! पाहूं या तर खरें. ( घटोत्कचास ) अहो महावीर, आमच्या सुटकेची कांहीं आशा....?

**घटोत्कच** : सुटका? एका अटीवर—

**केशवदास** : कोणती अट?

**घटोत्कच** : माझी परमपूज्य आई आहे. तिनें मला आज्ञा केली कीं, 'मुला, माझ्या उपवासाचें पारणें फेडण्यासाठीं या वनांतून एखादा माणूस पकडून घेऊन ये'. असा शोध घेत असतांना तुम्ही माझ्या हातीं पडलांत. आपली चारित्र्यवान् धर्मपत्नी आणि दोन मुलें यांच्यासकट स्वतःची सुटका व्हावी अशी तुझी इच्छा असेल तर तुझी शक्ति आणि माझी शक्ति यांचा नीट विचार कर आणि एक मुलगा माझ्या ताब्यांत दे.

**केशवदास :** ( उसळून ) राक्षसाधमा ! या ब्राह्मणाला तूं इतका नीच समजतोस ? मी वृद्ध आहे, पण वेदाध्ययन केलेला ब्राह्मण आहे. शीलगुणसंपन्न पुत्राला तुझ्या नरभक्षकाच्या हातीं देऊन मी कोणतें सुख मिळविणार आहे ?

**घटोत्कच :** हे द्विजश्रेष्ठा ! माझ्या सांगण्याप्रमाणें एका पुत्राला सोडून द्यायला तूं तयार नसशील तर एका क्षणांत तुझ्यासकट सर्व कुटुंबाचा नाश झालाच म्हणून समज.

**केशवदास :** माझा निश्चय अढळ आहे. माझें हें शरीर म्हातारपणानें जर्जर झालें आहे. ह्या शरीरानें होण्यासारखें सारें झालें आहे. माझ्या पुत्राचा प्राण वाचविण्यासाठीं राक्षसरूपी अग्नींत, यज्ञविधीनें शुद्ध करून, त्याची आहुति द्यायला मी तयार आहें.

**ब्राह्मणी :** ( आवेगानें ) नाहीं आर्य, आपण असें कसें करूं शकाल ? पत्नीच्या निष्ठेची सांगता केवळ पतीविषयींचा धर्म पाळण्यानेंच होत असते ! माझ्या शरीरानें आर्यांचें आणि कुलाचें रक्षण करण्याची माझी इच्छा आहे. ह्यांतच त्याचें साफल्य आहे.

**घटोत्कच :** ( मध्येंच ) बाई, माझ्या आईला स्त्री चालणार नाहीं.

**केशवदास :** मी येतों तुमच्याबरोबर.

**घटोत्कच :** ( किंचित् रागानें ) तूं म्हातारा आहेस. चल हट !

**मोठा :** बाबा, बोलूं का ?

**केशवदास :** बोल, लवकर बोल.

**मोठा :** माझे प्राण देऊन वडिलांचे प्राण वांचवावेत अशी माझी इच्छा आहे. आपल्या कुटुंबाच्या रक्षणासाठीं तुम्ही मला सोडावें.

**मधला :** दादा, असें नाहीं ! ज्येष्ठ मुलगा हा कुलांत आणि जगांतहि श्रेष्ठ समजला जातो. आपल्या आईवडिलांना तो अत्यंत प्रिय असतो. तेव्हां माझें गुरुजनाविषयींचें कर्तव्य स्मरून मीच जाईन म्हणतों.

**धाकटा :** दादा, अण्णा ! असें कसें बोलतां तुम्ही ? मोठा भाऊ म्हणजे वडिलांसारखा असें ब्रह्मवादीच सांगतात. तेव्हां गुरुजनांचें प्राणरक्षण करायला मीच काय तो योग्य आहे.

**मोठा :** बाळ, तूं म्हणतोस ते खरें नाहीं. पिता संकटांत सांपडला असतां ज्येष्ठ पुत्रानें त्याला तारलें पाहिजे. तेव्हां आई-वडिलांचे प्राण वांचविण्यासाठीं मलाच गेलें पाहिजे.

**केशवदास :** मोठा मुलगा म्हणजे प्राणांचा ठेवा. त्याला कसें सोडूं मी ?

**ब्राह्मणी :** आर्यांना मोठा हवा आहे, तसा मला धाकटा हवा आहे.

**मधला :** ( अर्धवट स्वतांशीं ) मी आईला नको आहे, बाबांना नको आहे ! मी कोणाला हवा आहे ?

**घटोत्कच :** ( मध्येंच ) मला चालेल ! ( मधल्यास ) चल लवकर माझ्याबरोबर.

**मधला :** स्वतःचे प्राण देऊन मी गुरुजनांचे प्राण वांच-विले—धन्य झालों मी ! थोर लोकांच्या ठायीं एक वेळ बंधुप्रेम

आढळेल, पण स्वतःच्या शरीराची आसक्ति कधींच दिसून येणार नाहीं !

**घटोत्कच :** ( कौतुकानें ) आपल्या आतांविषयीं केवढा जिव्हाळा या ब्राह्मणपुत्राला आहे !

**मधला :** ( केशवदासाजवळ जाऊन ) बाबा, नमस्कार करतों.

**केशवदास :** ( गहिंवरून ) ये, आमच्यावर अलोट प्रेम करणाऱ्या मुला, ये ! स्वतःच्या प्राणांचा बदला देऊन तूं आपल्या माता-पित्यांचे प्राण वांचविलेंस तर अपवित्र आत्म्यांना कधींहि न मिळणाऱ्या त्या ब्रह्मलोकाची तुला प्राप्ति होवो !

**मधला :** धन्य झालों ! ( आईकडे वळून ) आई, नमस्कार.

**ब्राह्मणी :** ( रुद्ध कंठानें ) बाळ, चिरंजीव हो.

**मधला :** तुझी कृपा ! ( मोठ्या भावास ) दादा. नमस्कार.

**मोठा :** ( मिठी मारून, साश्रु स्वरानें ) ये, ये, मला घट्ट मिठी मार ! पवित्र गुणांनीं तुला मिठी दिली आहे. तुझी कीर्ति सर्व पृथ्वीला मिठी घालील !

**मधला :** मेहेरबानी !

**धाकटा :** अण्णा, मी नमस्कार करतों.

**मधला :** कल्याण असो !

**धाकटा :** अशीच कृपा असूं दे.

**मधला :** ( घटोत्कचास ) अहो महाराज ! मी कांहीं विचारूं का ?

**घटोत्कच :** विचार, लवकर विचार.

**मधला :** या वनाच्या मध्यें जलाशय आहे असें वाटतें. मी परलोकाच्या प्रवासाला निघालों आहे. तर तेथें तहान भागवीन म्हणतों.

**घटोत्कच :** दृढनिश्चयी मुला, जा. मात्र माझ्या आईची न्याहारीची वेळ होऊन गेली आहे. तेव्हां लवकर परत ये.

**मधला :** बाबा, जातों मी. ( जातो. )

**केशवदास :** ( शोकावेगानें ) अरेरे ! आम्हांला लुटलें, सर्वस्वी लुटलें ! माझ्या वंशरूपी पर्वताला तीन शिखरें होतीं आणि त्यांनीं तो सुंदर दिसत होता. परंतु आतां मधलें शिखर कोसळून पडल्यानें माझ्या मनाला वेदना होत आहेत ! ( ओरडून ) बाळा ! ( पाहून ) गेलाच का हा ! माझ्या तरुण मुला ! तारुण्याला शोभेल अशी तुझी कांति होती.... बुद्धीला शिस्त होती आणि वेदाध्ययनाची आसक्ति होती.... अरेरे ! फुलांनीं बहरलेलें झाड हत्तीच्या सुळ्यानें मोडून पडावें तसा तूं आतां नाश पावशील ना ?

**घटोत्कच :** ( चुळबुळत ) ह्या ब्राह्मणबटूला उशीर होतो आहे. आईच्या न्याहारीची वेळ निघून चालली आहे. काय बरें करूं ? हां.... ठीक. ( केशवदासाकडे पाहून ) ए ब्राह्मणा तुझ्या मुलाला हाक मार.

**केशवदास :** ( उसळून ) तुझे शब्द राक्षसाच्या सुद्ध तोंडीं शोभणार नाहींत !

**घटोत्कच :** ( स्वतांशीं ) रागावला वाटतें ? ( उघड ) क्षमा करा महाराज, क्षमा करा. हा माझ्या प्रकृतीचाच दोष

आहे. ( शक्य तितक्या सौम्यपणें ) बरें, आतां असें सांगा: आपल्या मुलाचें नांव काय ?

**केशवदास :** तें सुद्धां तुला ऐकविणें शक्य नाहीं.

**घटोत्कच :** बरोबर आहे. ( मुलाकडे वळून ) ब्राह्मणकुमारा, तुझ्या भावाचें नांव काय बरें ?

**मोठा :** ( अर्धवट स्वतांशीं ) गरीब बिचारा मधला— मध्यम !

**घटोत्कच :** ( ऐकून ) मधला ? मध्यम ? योग्य नांव आहे ! मीच हांका मारतों. ए मध्यमा, मध्यमा ! लवकर ये !

[ रंगभूमीच्या एका कोपऱ्याला, अगदीं मागें, वनमध्यांत भीमाची आकृति दिसते. ]

**भीम :** ( स्वतांशीं ) हा कोणाचा बरें आवाज ? वृक्षांनीं दाटलेल्या घनगर्द अशा या वनांत शेंकडों पक्ष्यांच्या गजबजाटाच्या वर हा तारस्वर उमटत आहे ! ह्या स्वरानें माझ्या मनाला ताप चढत आहे. अर्जुनाच्या किती सारखा आहे हा स्वर !

**घटोत्कच :** ह्या ब्राह्मणबटूला उशीर होतो आहे. आईच्या न्याहारीची वेळ निघून चालली आहे, काय बरें करूं ? हां.... समजलें. मोठ्यानें हांका मारतों. ( मोठ्यानें ) ए मध्यम ! लवकर ये.

**भीम :** अरे, या वनाच्यामध्यें माझ्या व्यायामांत अडथळा उत्पन्न करून कोण बरें मला ' मध्यम ' म्हणून बोलावतें आहे ? जाऊन पाहूं या तर खरें. ( पुढें येतो. घटोत्कचाकडे पाहून

विस्मयानें, स्वतांशीं ) अहाहा ! किती आकर्षक आहे हा तरुण ! सिंहासारखें मुख, सिंहासारखे दांत, मद्यासारखे डोळे, स्निग्ध आणि गंभीर आवाज पिंगट भुवया, ससाण्यासारखें नाक, गजेंद्रासारखी हनुवटी, विस्कटलेले चमकदार केस, रुंद छाती, वज्रासारखी भक्कम कमर, गजश्रेष्ठासारखी चालण्याची ऐट, लांब बाहू, पुष्ट खांदे....हें सारें पाहून निश्चित वाटतें कीं हा एखाद्या लोकवीराचा राक्षसी स्त्रीपासून झालेला अत्यंत बलशाली पुत्र असला पाहिजे !

**घटोत्कच :** ह्या ब्राह्मणकुमाराला फार उशीर झाला आहे. मोठ्यानें हांक मारली पाहिजे. ( ओरडून ) ओ ऽऽ मध्यमा ! लवकर ये.

**भीम :** ( समोर येत ) आलों आहे कीं !

**घटोत्कच :** ( पाहून ) हा कांहीं ब्राह्मणाचा मुलगा नाहीं. ( स्वतःशीं ) अहाहा ! किती देखणा आहे हा पुरुष ! ह्याची आकृति सिंहासारखी आहे. सोन्याच्या तालवृक्षासारखे याचे बाहू आहेत. कमर बारीक आहे. शरीराच्या दोन्ही बाजू गरुडाच्या पंखासारख्या मृदु आहेत. विकसित कमलाच्या पाकळ्याप्रमाणें याचे डोळे आहेत. हा विष्णूच असावा ! एखादा जवळचा आप्त यावा त्याप्रमाणें हा माझी दृष्टि वेधून घेत आहे. ( उघड ) ए, मी मध्यमाला हांका मारतों आहे.

**भीम :** म्हणून तर मी आलों.

**घटोत्कच :** काय ? तुमचेंहि नांव ‘ मध्यम ’ आहे ?

**भीम** : अर्थात्! ज्यांचा कोणीहि वध करूं शकणार नाहीं अशांच्यांतला मी मध्यम[1] आहे. जे गर्वशाली आहेत त्यांच्यातला मी मध्यम[1] आहे. या पृथ्वीवरील मी मध्यम[2] आहे. भल्या माणसा! भावांच्या मध्यें देखील मी मध्यमच आहे!

**घटोत्कच** : असाल!

**भीम** : आणखी असें पाहा : पंच महाभूतांतला मी मध्यम आहे. पार्थिवांच्यात मी मध्यम[1] आहे या जगांत भयांच्या बाबतींत मी मध्यम[4] आहे. आणि सर्व कार्यांमध्यें मी मध्यम[5] आहे!

**केशवदास** : ( स्वतःशीं ) आपण 'मध्यम' असल्याचें हा सांगतो म्हणजे हा नक्की पांडवांच्यांतला मधला असला पाहिजे. मृत्यूच्या अरेरावीपासून आमची सुटका करण्यासाठीं हा येथें येऊन उभा राहिला आहे असें वाटतें.

[ मधला पुत्र प्रवेश करतो. ]

**मधला** : ( स्वतःशीं ) कमलांनीं भरलेल्या जलाशयांत आचमन करून, कमलाच्या पाकळ्यांनीं उज्ज्वल झालेल्या पाण्याची तिलांजलि मीं आपल्या हातानें स्वतःला दिली! परलोकांत गेल्यावर मला कोण पाणी देणार? ( पुढें येऊन घटोत्कचाच्या जवळ जात ) अहो महाराज! मी आलों आहे.

**घटोत्कच** : ( पाहून ) हां....तूं खरा मध्यम! मध्यमा, चल माझ्या मागून.

**केशवदास** : ( आवेगानें भीमाजवळ जाऊन ) मध्यमा! ह्या ब्राह्मणकुलाला वांचव!

---

१ श्रेष्ठ, मुख्य, अग्रगण्य. २ मध्यबिंदुसारखा. ३ प्राणभूत. ४ बेदरकार. ५ मधला मार्ग स्वीकारणारा, समतोल वृत्तीचा.

**भीम :** भिऊं नका, भिऊं नका ! मी मध्यम आपल्याला अभिवादन करतों.

**केशवदास :** वायूसारखा दीर्घायु हो !

**भीम :** आपला अनुग्रह ! महाराज, आपल्या भीतीचें कारण ?

**केशवदास :** ऐक. मी ब्राह्मण आहें. माझें नांव केशवदास. माझें गोत्र माठर. मी कल्पशाखेचा अध्वर्यु आहें. मी यूप नांवाच्या गांवी राहतों. हें गांव कुरुराज युधिष्ठिराच्या एके-काळीं आधिपत्याखालीं असलेल्या कुरुजाङ्गल प्रदेशांत आहे. उत्तर दिशेला उद्यामक नांवाच्या गांवीं माझे मामा कौशिकगोत्री यज्ञबंधु म्हणून असतात. त्यांच्या मुलाचें उपनयन आहे. त्यासाठीं मी सहकुटुंब निघालों होतों—

**भीम :** आपला प्रवास निर्विघ्न होवो ! बरें, मग काय झालें ?

**केशवदास :** तर तेवढ्यांत हा—नील मेघांप्रमाणें शरीर असलेला, कमलाच्या पाकळ्यांप्रमाणें रुंद डोळ्यांचा, सिंहाच्या गतीची ऐट मिरविणारा आणि भयानक दांत असलेला राक्षस—जगांत कशाचीहि भयभीति न बाळगतां, तुमच्यासारख्यांच्या देखत, मला माझ्या बायकोमुलांसकट मारून टाकण्याच्या इरा-द्यानें अंगावर धावून आला आहे !

**भीम :** अस्सें ! यानें ब्राह्मणाच्या मार्गांत संकट उत्पन्न केलें आहे काय ? ठीक, याला आवरलेंच पाहिजे. ( घटोत्कचास ) ए प्राण्या ! थांब, उभा राहा.

**घटोत्कच :** ( तुच्छतेनें ) उभाच आहे कीं !

**भीम :** ब्राह्मणांना कां त्रास देत आहेस तूं ? हा वृद्ध ब्राह्मण

चंद्रासारखा आहे. त्याचीं मुलें नक्षत्रांसारखीं त्याच्याभोंवतीं आहेत. त्याची पत्नी सौम्य चांदण्यासारखी आहे. तूं मात्र राहू-सारखा उपटला आहेस !

**घटोत्कच :** हो, हो ! राहूच !

**भीम :** काय ? ( किंचित् थांबून, अजूनहि शांतपणें ) हा श्रेष्ठ ब्राह्मण लौकिक व्यवहारापासून निवृत्त झालेला आहे. त्याचे अपराध कांहींहि असले तरी त्याचा प्राण घेणें अनुचित आहे. पत्नी आणि मुलें यांच्यासकट सोडून दे त्याला !

**घटोत्कच :** नाहीं सोडणार !

**भीम :** ( स्वतःशीं ) अरे, हा कोणाचा पुत्र असावा बरें ! माझ्या सर्व भावांचे गुण चोरून घेणारा हा कोण ? या मुलाची ही गर्वोद्धत वृत्ति पाहून मला तर अभिमन्यूची आठवण येते आहे ! ( उघड ) हे पाहा प्राण्या ! सोडून दे त्यांना.

**घटोत्कच :** ( ठांसून ) नाहीं सोडणार ! ' सोडून दे ' म्हणून खुद्द माझ्या पित्यानें जरी मला दरडावून सांगितलें तरी मी सोडणार नाहीं. कारण मी ह्याला माझ्या आईच्या आज्ञेनें पकडलें आहे.

**भीम :** ( स्वतःशीं ) काय म्हणाला हा ? आईची आज्ञा ? बिचारा मोठा आज्ञाधारक दिसतो आहे ! आई म्हणजे केवळ मनुष्याचेंच नव्हे तर देवांचेंहि दैवत होय ! आईची आज्ञा पाळायची म्हणून तर आमची ही दशा झाली ! ( उघड ) ए प्राण्या, तुला एक प्रश्न विचारायचा आहे.

**घटोत्कच :** बोल, लवकर बोल.

**भीम :** तुझ्या आईचें नांव काय ?

**घटोत्कच :** ऐक. कौरवकुलाचा दीप जो महान् पांडव तो पति लाभल्यामुळें जिचें भाग्य, पूर्णचंद्रानें आकाश उजळावें तसें, उजळलें आहे. ती हिडिंबा नांवाची राक्षसी—

**भीम :** ( अत्यानंदानें, स्वतःशीं ) अस्सें ! हा हिडिंबेचा मुलगा काय ? मग याचा गर्व अगदीं योग्य आहे ! ( विचार करीत ) याचें रूप, धैर्य, शक्ति या सर्व गोष्टी पांडवांशीं जुळण्यासारख्या आहेत. पण भूतमात्राच्या बाबतींत दयेला पारखें झालेलें याचें मन कोणासारखें आहे ? ( उघड ) हें पाहा प्राण्या, सोडून दे ह्यांना !

**घटोत्कच :** नाहीं सोडीत !

**भीम :** ब्राह्मणमहाशय, आपल्या मुलाला घेऊन चला. मी जातों याच्याबरोबर.

**मधला :** वा ! वा ! असें कसें कराल ? गुरुजनांच्या प्राणांच्या अपेक्षेनें माझे प्राण मी देऊन बसलों आहे. तुम्ही तरुण आहांत, रूपवान् आहांत, गुणवान् आहांत ! तुम्ही या पृथ्वीतलावर राहणेंच योग्य.

**भीम :** ( मधल्यास ) उदार मुला, तुझें बोलणें बरोबर नाहीं. माझा जन्म क्षत्रियकुलांत झाला आहे. ब्राह्मणजाति ही अत्यंत आदराला पात्र आहे. म्हणून माझें शरीर देऊन ब्राह्मणाचें शरीर वांचविण्याची माझी इच्छा आहे.

**घटोत्कच :** ( स्वतःशीं ) अस्सं, हा क्षत्रिय आहे काय ? म्हणूनच एवढा गर्व करतो आहे. ठीक.... यालाच मारून घेऊन जातों मी ! ( उघड ) या ब्राह्मणाच्या आड कोण येतें आहे,पाहूं !

**भीम :** मी—

**घटोत्कच :** काय, तुम्ही ?

**भीम :** हो.

**घटोत्कच :** मग तुम्हीच चला माझ्याबरोबर.

**भीम :** मी शक्तीनें आणि पराक्रमानें श्रेष्ठ आहे ! मी असा येणार नाहीं. ताकद असली तर बळजबरीनें घेऊन जा मला.

**घटोत्कच :** मी कोण आहे हें माहीत आहे कां तुम्हांला ?

**भीम :** माहीत आहे.... माझा मुलगा !

**घटोत्कच :** ( उसळून ) कसें, कसें म्हणतां मला आपला मुलगा म्हणून ?

**भीम :** ( स्वतःशीं ) अरे, खवळला वाटतें ! ( उघड ) क्षमा करा ! सर्व प्रजाजनांना क्षत्रिय ' पुत्र ' म्हणून संबोधतात. म्हणून मी तुला पुत्र म्हटलें.

**घटोत्कच :** आणि भ्याडाचें हत्यार उचललेंत !

**भीम :** मी शपथेवर सत्य तेंच सांगतों भय ही काय चीज आहे हें मला ठाऊक नाहीं. तुझ्यापासून ती जाणून घ्यावी अशी मात्र इच्छा आहे. भल्या माणसा ! हें भय कसें असतें तें सांग. म्हणजे त्याचे गुणदोष समजावून घेऊन मला वागायला बरें पडेल.

**घटोत्कच :** भय म्हणजे काय तें शिकवतोंच तुम्हांला. घ्या शस्त्र—

**भीम :** शस्त्र ? घेतलें आहे कीं !

**घटोत्कच :** ( विस्मयानें ) म्हणजे काय ?

**भीम :** शत्रूंना दडपण्यांत आनंद मानणारा, सोन्याच्या खांबा-सारखा दिसणारा हा माझा उजवा बाहु हेंच माझें स्वाभाविक शस्त्र !

**घटोत्कच :** हें बोलणें माझे पिताजी भीम यांनाच शोभ-ण्यासारखें आहे !

**भीम :** हा कोण बुवा भीम ? ( खोट्या उपहासानें ) विश्व-कर्ता ब्रह्मा, शिव, विष्णु, कृष्ण, इंद्र, शक्तिशाली कार्तिकेय, यम....यांच्यापैकीं कोणासारखा तुझा पिता आहे तें सांग तरी, भल्या माणसा !

**घटोत्कच :** सर्वांच्या सारखा.

**भीम :** हट् ! खोटी गोष्ट !

**घटोत्कच :** ( रागानें उसळून ) खोटं म्हणून म्हणतो काय ? माझ्या वडिलांचा अधिक्षेप करतोस ? बरें आहे. हा मोठा वृक्ष उपटून हाणतों. ( वृक्ष उपटून फेकतो. ) काय ? यानें हा मरत नाहीं ! काय करूं बरें ? हां....असेंच ! या पर्वताचें शिखर उखडून प्रहार करतों ! ( पर्वतशिखर उपटून फेकण्याच्या पवित्र्यांत ) मी फेकलेलें हें पर्वतशिखर तुझे प्राण घेऊनच खालीं पडेल—

**भीम :** ( हंसत ) जंगली हत्ती चवताळला तरी कांहीं वाघा-वर मात करूं शकत नाहीं !

**घटोत्कच :** ( पर्वतशिखराचा प्रहार करून, स्वतःशीं, विस्म-यानें ) काय ? यानें पण हा मरत नाहीं ! काय करूं बरें ? ठीक, समजलें. ( उघड ) मी भीमसेनांचा मुलगा आणि वायूचा नातू

आहे ! राहा आतां तयारीत. बाहुयुद्धांत माझी कोणी बरोबरी करूं शकत नाहीं.

[ दोघे बाहुयुद्ध करतात. ]

**घटोत्कच** : ( भीमसेनाला पेंचांत पकडून ) बळकट पाशांनीं हत्तीला पकडावें तसें माझ्या बाहूंनीं मी तुला बांधून ठेवलें आहे. माझ्या बाहूंची ताकद झुगारून तूं आतां कसा सुटतोस तें च पाहूं !

**भीम** : ( स्वतःशीं ) खरेंच यानें मला बांधून टाकलें आहे ! ( आनंदानें ) सुयोधना ! तुझा शत्रुपक्ष फोंफावतो आहे ! सांभाळून राहा ! ( उघड ) ए प्राण्या, नीट अवधान ठेव.

**घटोत्कच** : आहे माझें अवधान.

**भीम** : ( पेंच सोडवून ) आपल्या ताकदीचा गर्व सोडून दे. तुझें पाणी जोखलें मी, वीरा ! बाहुयुद्धांत मला कधींच थकवा यायचा नाहीं.

**घटोत्कच** : ( स्वतःशीं ) अरे, यानें सुद्धां हा मरत नाहीं ! काय बरें करूं ? हां....समजलें. आईच्या कृपेनें मला मायापाश लाभला आहे. त्यानें बांधून याला घेऊन जावें. पाणी कुठें मिळेल बरें ? ( विचार करून ) अरे पर्वता, पाणी हवें आहे ! ....शाबास ! लागला झरायला ! ( आचमन करून, मंत्र जपून, उघड ) मायापाशानें मी तुला बांधलें आहे. आतां असहायपणें माझ्या मागून येशील. ( मायापाशांनीं भीमाला बांधून टाकतो. ) उत्सवाच्या प्रसंगीं दोऱ्यांनीं बांधलेला इंद्रध्वज जसा शोभतो तसा शोभतो आहेस ! ( हंसतो. )

**भीम** : ( स्वतःशीं ) अरे, खरेंच मायापाशांनीं मला बांधून टाकलें आहे ! काय बरें करावें ? हं....असेंच ! मायापाश सोड-

विण्याचा मंत्र मला शंकराच्या कृपेनें मिळाला आहे. त्याचा जप करतों. पण पाणी कुठून मिळणार ? ( उघड ) अरे ब्राह्मणकुमारा, कमण्डलूंतलें पाणी जरा आण बरें.

**केशवदास** : ( पुढें होऊन ) हें पाणी.

[ भीम पाणी घेतो; आचमन करून मंत्र जपतो आणि माया नाहींशी करतो. ]

**घटोत्कच** : ( पाहून, स्वतःशीं ) अरे, पाश सुटला ! आतां काय करावें ? ठीक....असेंच केलें पाहिजे. ( उघड ) हे पुरुषा ! पूर्वीच्या वचनाची आठवण ठेव.

**भीम** : वचन ? हं....आठवलें. हो पुढें.

[ घटोत्कच पुढें आणि भीम मागें असे हिडिंबेच्या निवासा-कडे जाऊं लागतात. ]

**केशवदास** : मुलांनो, आतां आपण काय करायचें ? भीम तर चालला —दाहक आणि उग्र रूप असलेल्या, बाहूबल आणि पराक्रम या उग्र गुणांनीं युक्त असलेल्या ह्या राक्षसावर मात करून हा भीम, एखादा मस्त बैल पावसाचा मारा झटक्यानें चुकवून जसा जाईल तसा डौलानें आणि सावकाश चालला आहे.

[ भीम आणि घटोत्कच हिडिंबेच्या निवासाच्या दाराजवळ येतात. ]

**घटोत्कच** : उभा राहा इथें. तूं आल्याची बातमी मी आईला सांगतों.

**भीम** : ठीक आहे. जा.

[ घटोत्कच आंत जाऊन लगेच हिडिंबेबरोबर परत येतो. भीम जरा मागल्या बाजूस उभा आहे. केशवदास वगैरे रंग-भूमीच्या अगदीं मागें आहेत. ]

**घटोत्कच :** ( वांकून ) आई, नमस्कार करतों. तुला भोजनासाठीं मनुष्य हवा होता ना कधींपासून ? तो आणला आहे.

**हिडिंबा :** बाळ, चिरंजीव हो.

**घटोत्कच :** तुझी कृपा.

**हिडिंबा :** बाळ, कशा प्रकारचा मनुष्य आणला आहेस ?

**घटोत्कच :** आई, केवळ आकारानें माणूस आहे; पराक्रम पाहिला तर मात्र नाहीं !

**हिडिंबा :** ब्राह्मण आहे ?

**घटोत्कच :** ब्राह्मण नाही.

**हिडिंबा :** मग म्हातारा ?

**घटोत्कच :** म्हाताराहि नाहीं.

**हिडिंबा :** मग बाळ आहे ?

**घटोत्कच :** छे !

**हिडिंबा :** असें असेल तर मला पाहिलेंच पाहिजे.

[ दोघेहि पुढें सरून वळून पाहातात. भीम किंचित् पुढें येतो.]

**हिडिंबा :** ( भीमाला पाहून, घटोत्कचाकडे पाहात ) काय, हा मनुष्य आणलास ?

**घटोत्कच :** ( न उमजल्यामुळें, बुचकळ्यांत पडून ) कोण आहे हा, आई ?

**हिडिंबा :** ( हंसत ) माथेफिरू पोरा ! हें तर आपलें दैवत !

**घटोत्कच :** एँ ! कोणाचें दैवत ?

**हिडिंबा :** तुझें आणि माझें.

**घटोत्कच** : (अविश्वासानें) कशावरून ?

**हिडिंबा** : (हंसून) याच्यावरून! (भीमाजवळ जाऊन, वंदन करीत) महाराजांचा विजय असो!

**भीम** : (पाहून) ही कोण बरें ? (ओळख पटून, आनंदान) अरे, ही तर माझी पत्नी हिडिंबा! (तिच्याकडे वळून) देवी, आमचें राज्य नष्ट होऊन आम्ही गहन अरण्यांत भटकत असतांना तूं सहानुभूति दाखविलीस आणि आमचें दुःख नाहींसें केलेंस! (किंचित् थांबून) पण हिडिंबे, या प्रकाराचा अर्थ काय ?

**हिडिंबा** : (कानांत सांगत) महाराज!....हा याचा अर्थ.

**भीम** : (हंसून) जन्मानें राक्षसी आहेस....तुझी वागणूक मात्र तशी नाहीं.

**हिडिंबा** : (आनंदांत) ए माथेफिरू! आपल्या वडिलांना नमस्कार कर.

**घटोत्कच** : बाबा! अज्ञानामुळें मी तुम्हांला अगोदर वंदन केलें नाहीं. आपल्या पुत्राचा हा अपराध पोटांत घ्याल अशी आशा आहे. (त्याच्या पायांशीं वांकून) कौरववनाला दावाग्नी-प्रमाणें असणारा हा घटोत्कच वंदन करीत आहे. पुत्राच्या हूड-पणाची क्षमा असावी.

**भीम** : (आनंदानें) ये, ये पुत्रा! तुझ्या अपराधाची क्षमा यापूर्वींच केली आहे. (आलिंगन देऊन) हा कौरववनाचा दावाग्नि! पित्याच्या हृदयाला पुत्राची ओढ असणारच! मुला, शक्तीनें आणि पराक्रमानें सर्वांवर मात कर!

**घटोत्कच** : तुमचा आशीर्वाद!

[ केशवदास व त्याचें कुटुंब पुढे येतात. ]

**केशवदास :** अस्सें ! हा भीमसेनांचा पुत्र घटोत्कच काय !

**भीम :** मुला, ह्या माननीय केशवदासांना नमस्कार कर.

**घटोत्कच :** महाराज, नमस्कार करतों.

**केशवदास :** गुणांनीं आणि कीर्तीनें आपल्या पित्यासारखा हो.

**घटोत्कच :** आपली कृपा !

**केशवदास :** ( आनंदानें ) वृकोदरा ! आमच्या कुलाचें रक्षण झालें, स्वकुलाचा मान चढला ! जातों आम्ही आतां.

**भीम :** ( विनयपूर्वक ) आपल्या आशीर्वादानेंच या सर्व गोष्टींचा शेवट शुभ झाला. आमचा आश्रम इथून फार दूर नाहीं. तेथें विश्रांति घ्यावी आणि मग निघावें.

**केशवदास :** आमचा जीव वांचविलास यांत सगळा पाहुण-चार झाला. आम्ही आतां निघावें हेंच ठीक.

**भीम :** निघतां ? तर सहकुटुंब पुन्हां आपलें दर्शन व्हावें अशी विनंति आहे.

**केशवदास :** हां....हें ठीक आहे.

[ पत्नी व तिन्ही मुलें यांच्यासह केशवदास जाऊं लागतो. ]

**भीम :** हिडिंबे, इकडे ये. बाळ घटोत्कचा, इकडे ये. पूज्य केशवदासांना आश्रमाच्या दारापर्यंत तरी पोंचवूं या.

[ सर्व जातात. ]

* * *



# दूत वाक्य

## पात्रें

( प्रवेशानुक्रमानें )

कांचुकीय
दुर्योधन
वासुदेव
सुदर्शन
धृतराष्ट्र

[ दुर्योधनाचे सेवक मंत्रशालेची रचना करण्यांत आणि सभेची सिद्धता करण्यांत गुंतलेले आहेत. सभासदांचीं आसनें मांडून झालीं आहेत. एवढ्यांत दुर्योधनाचा कांचुकीय प्रवेश करतो. ]

**कांचुकीय :** अहो द्वाररक्षकहो ! महाराज दुर्योधनांची आज्ञा आहे. त्यांना आज सर्व राजवर्गाशीं मंत्रणा करावयाची आहे. तेव्हां सर्व राजांना बोलावून आणा. ( वळून पाहात ) अरे, हे महाराज दुर्योधन इकडेच येत आहेत; श्यामल वर्णाचे, तरुण, शुभ्र रेशमाचें उत्तरीय घेतलेले, छत्र आणि मनोहर चामर बरोबर असलेले आणि राजलक्ष्मीनें युक्त; अंगराग लाविलेला आहे; खास अलंकाराच्या, रत्नांच्या प्रभेनें अंगावर रंगच्छटा पसरली आहे; नक्षत्रांमध्यें पूर्णचन्द्र तसे हे शोभत आहेत !

[ निर्देश केल्याप्रमाणें दुर्योधन प्रवेश करतो. ]

**दुर्योधन :** चालून आलेल्या या रणोत्सवाचा विचार एकदम मनांत आला म्हणजे रोष गळून माझें हृदय हर्षानें भरून येतें ! माझी इच्छा आहे कीं, पांडवसभेंतील मदोन्मत्त हत्तीच्या तोंडांतून त्यांचे मुसळासारखे दांत उपटून टाकावेत !

**कांचुकीय :** महाराजांचा जय असो ! महाराजांच्या आज्ञे-प्रमाणें सर्व राजमंडळाला पाचारण केलें आहे.

**दुर्योधन :** छान केलेंस. जा आतां अंतःपुरांत.

**कांचुकीय :** जशी महाराजांची आज्ञा. ( जातो. )

**दुर्योधन :** ( वळून ) वैकर्ण, वर्षदेव ! बोला— अकरा अक्षौहिणींचा माझ्या सैन्याचा व्याप आहे. या सैन्याचा सेनापति कोणाला करावें ? काय म्हणालांत तुम्ही ? ‘ हा गंभीर प्रश्न आहे. सल्लामसलत करून बोलणेंच योग्य होईल.’ बरोबर आहे. तर मंत्रशालेकडेच जाऊं या.

[ सर्वजण मंत्रशालेजवळ येतात. ]

**दुर्योधन :** ( स्वागत करीत ) आचार्य, अभिवादन करतों. यावें मंत्रशालेंत. पितामह, अभिवादन करतों. आपणहि मंत्रशालेंत यावें. मामा, अभिवादन. तुम्हीहि या ना मंत्रशालेंत ! वैकर्ण, वर्षदेव ! तुम्हीहि दोघे चला आंत. अहो सर्व क्षत्रियहो ! मोकळ्या मनानें आंत या. मित्रा कर्णा, आपणहि चलूं या.

[ सर्वजण मंत्रशालेंत प्रवेश करतात. ]

आचार्य, हें कूर्मासन. बसावें. पितामह, हें सिंहासन. बसावें. मामा, हें चर्मासन. बसा. वैकर्ण, वर्षदेव, तुम्हीहि बसा कीं. अहो, सर्व क्षत्रियहो ! आपण मोकळ्या मनानें आसनस्थ व्हा. काय, काय म्हणतां ? ‘ महाराज अजून बसले नाहींत—’ ( हंसून ) सेवाधर्म पडला ना ! बरं, बरं....हा मी बसतों. मित्रा कर्णा तूंहि बैस ना. ( बसून ) वैकर्ण, वर्षदेव ! आतां बोला ! माझी अकरा अक्षौहिणींची प्रचंड सेना आहे. तिचा सेनापति व्हायला कोण योग्य आहे ? काय म्हणतां तुम्ही ? ‘ हे गांधारराज सांगतील ’ ? हरकत नाहीं. मामांना सांगूं देत. काय म्हणालांत मामा ? ‘ हे सन्मान्य गांगेय येथें असतांना सेनापति व्हायला दुसरा कोण लायक असणार ? ’ योग्य बोललांत, मामा ! छान, छान ! पितामहच सेनापति होऊं देत. आमची पण हीच उत्कट इच्छा आहे. प्रचंड वाऱ्यानें सोपकून काढलेल्या महासागराच्या गर्जनेप्रमाणें सैन्यांचा गजबजणारा आवाज, दुंदुभींचा ध्वनि आणि शंखनाद दुमदुमत असतांना, एकीकडे गांगेयांच्या मस्तकावर अभिषेकाच्या जलधारा पडूं देत—आणि त्याच वेळीं दुसरीकडे शत्रुराजांचीं हृदयें पड खाऊं देत !

[ कांचुकीय येतो. ]

**कांचुकीय :** महाराजांचा जय असो ! पांडवांच्या शिबिराहून हे पुरुषोत्तम नारायण दूतसंदेश घेऊन आले आहेत.

**दुर्योधन :** पुन्हां बोल पाहूं, बादरायणा ? काय ? तो कंसाचा चाकर दामोदर तुझा पुरुषोत्तम काय ? तो गवळ्याचा पोर तुझा पुरुषोत्तम काय ? बार्हद्रथानें राज्याच्या आणि कीर्तीच्या रूपानें ज्याचा राजभोग हिरावून नेला तो तुझा पुरुषोत्तम ? अरे ! सम्राटाच्या सान्निध्यांत वावरणाऱ्या सेवकाला रीतिरिवाज कळूं नयेत म्हणजे काय ! किती उद्धटपणाची ह्याची ही भाषा ! जा, काळें कर तोंड !

**कांचुकीय :** क्षमा, महाराज ! मी गोंधळलों....अन् त्यामुळें उपचार विसरलों. ( दुर्योधनाच्या पायांशीं वांकतो. )

**दुर्योधन :** ' गोंधळलों ' म्हणालास ? हं.......सामान्य माणसांचा गोंधळ होतो खरा ! ऊठ, ऊठ.

**कांचुकीय :** कृपा झाली.

**दुर्योधन :** आतां मी शांत झालों. सांग, हा कोण दूत आला आहे ?

**कांचुकीय :** केशव दूत म्हणून आला आहे.

**दुर्योधन :** केशव ना ? अशी इच्छा ठेवावी....हीच रीत योग्य होय ! अहो राजेहो ! दूताची भूमिका घेऊन आलेल्या केशवाच्या बाबतींत काय करणें उचित होईल ? काय म्हणतां तुम्ही ? ' अर्घ्यप्रदान करून केशवाची पूजा करावी ' ? मला नाहीं पसंत ! आज त्याला पकडण्यांतच हित आहे, असें माझें मत आहे. हा वासुभद्र बंदिवासांत पडला तर डोळे गेल्यासारखे पांडव होतील !

आणि मग पांडवांची गति आणि मति नाहींशी झाली म्हणजे प्रतिस्पर्धाविरहित ही सारी पृथ्वी पण माझी होईल !....सांगून ठेवतों ! जो कोणी आतां उभा राहून केशवाचें स्वागत करील त्याला माझ्याकडून बारा सुवर्ण दंड होईल ! तेव्हां, डोकें नीट ठिकाणीं ठेवून असा !....( स्वतःशीं बोलत ) मला उत्थापन द्यायला लागूं नये म्हणून काय युक्ति करावी बरें ? शाबास, सापडला उपाय ! ( कांचुकीयाकडे वळून ) बादरायण, तो आपला चित्रपट घेऊन ये बरें ! अरे, ज्यावर द्रौपदीचे केस आणि वस्त्र खेंचण्याचा प्रसंग चित्रित केला आहे तो ! ( तोंड वळवून, गुपित बोलल्याप्रमाणें ) त्याच्यावर दृष्टि खिळवून राहतों म्हणजे केशव आल्यावर उठण्याची वेळच येणार नाहीं मला !

**कांचुकीय** : जशी महाराजांची आज्ञा.

[ जाऊन चित्रपट घेऊन येतो. ]

**दुर्योधन** : पसर माझ्यासमोर.

**कांचुकीय** : आज्ञा, महाराज !

[ चित्रपटाची गुंडाळी उलगडून चित्रपट पसरतो. ]

**दुर्योधन** : ( पाहात ) वाः ! सुंदर आहे चित्रपट ! हें पाहा, दुःशासनानें द्रौपदीचे विपुल केस पकडले आहेत.... आणि ही द्रौपदी दुःशासनाच्या तावडींत सांपडल्यावर भीतीनें गोंधळून हिचे डोळे विस्फारले आहेत.... राहूच्या जबड्यांत सांपडलेल्या चंद्रलेखेप्रमाणें दिसते आहे ही !

हा दुष्ट भीम— सर्व राजांच्या समक्ष द्रौपदीचा अपमान झाल्याचें पाहून त्याचा राग उसळला आहे आणि तो सभामंडपांतील खांब उचलूं पाहातो आहे !

हा युधिष्ठिर— याच्याजवळ सत्याचा गुण आहे; मात्र द्यूतामुळें याची बुद्धि भ्रष्ट झाली आहे. तिरपी नजर करून वृकोदराचा क्रोध तो शांत करूं पाहात आहे !

आणि हा इकडे अर्जुन— ह्याच्या डोळ्यांत राग मावत नाहीं. खालचा ओठ कांपतो आहे. सर्व शत्रुमंडळाला पाचोळा समजून, सर्व राजांना समूळ नष्ट करण्याच्या इराद्यानेंच कीं काय, हळू हळू गांडीवाची दोरी खेचतो आहे !

हा पाहा युधिष्ठिर अर्जुनाला थोपवून धरीत आहे.

हे नकुल-सहदेव— त्यांच्या चेहऱ्याचा रंग रागानें लाल-भडक झाला आहे; ते जोरजोरानें खालचा ओठ चावीत आहेत. कमर घट्ट कसून, चर्माचें अंगुलित्राण चढवून, तलवार घेऊन, मृत्यूची भीति न बाळगतां, दोन मृगबाळांनीं सिंहावर चाल करावी तसे, उतावीळपणें, आवेशानें ते माझ्या भावावर धावून गेले आहेत !

हा युधिष्ठिर बघा— दोघां कुमारांच्या जवळ जाऊन त्यांना अडवीत आहे. म्हणतो आहे : ' मी नीच आहें. माझी बुद्धि फिरली आहे. आणखी कसें ? तुम्ही नीति–अनीति जाणतां. ह्या वेळीं राग सोडून द्या. द्यूताच्या अधिकारांत हा अपमान झाला आहे. आपण तो सहन केला नाहीं तर तत्त्व-शील पुरुषांच्यामध्यें आपल्या पराक्रमावरहि शिंतोडे उडतील !'

हे गांधारराज— धूर्तपणानें फासे फेकून गर्वभरानें मुक्त हास्य करीत यांनीं आपल्या कीर्तीनें शत्रूचा आनंद जणूं कोमे-जवून टाकला आहे ! आतां आसनमांडी इकडे तिकडे हलवीत,

रडणाऱ्या द्रौपदीकडे तिरप्या नजरेनें पाहात....... द्यूताची नीति जाणून, ते जमिनीवर खुणेच्या रेघा करीत आहेत !

हे द्रोणाचार्य आणि भीष्मपितामह—द्रौपदीला पाहून लाज वाटून वस्त्रानें तोंड झाकून घेऊन बसले आहेत !

वाः ! काय सुंदर रंग वापरले आहेत ! भाव तरी किती योग्य प्रकारें दर्शविले आहेत ! चित्रांच्या रेषा किती योग्य आहेत ! सुस्पष्ट चितारला आहे हा चित्रपट ! खूष झालों मी ! ( वळून ) कोण आहे रे ?

**कांचुकीय :** ( पुढें होऊन ) जय महाराज !

**दुर्योधन :** बादरायण, जा; आणि केवळ गरुडाच्या वाहनामुळेंच चढून गेलेल्या त्या दूताला घेऊन ये.

**कांचुकीय :** जशी महाराजांची आज्ञा. ( जातो. )

**दुर्योधन :** मित्रा कर्णा, पांडवांच्या शब्दासाठीं दूताची भूमिका घेऊन एखाद्या चाकरासारखा तो कुष्णमति कृष्ण आतां आला आहे— असा निरोप आहे. मित्रा कर्णा, कान सज्ज कर तूं सुद्धां....... युधिष्ठिराचे बायकांसारखे गुळगुळीत शब्द ऐकण्यासाठीं ! ( हंसत सुटतो. )

[ येवढ्यांत वासुदेव व कांचुकीय प्रवेश करतात. ]

**वासुदेव :** ( स्वतःशीं ) खरोखर, धर्मराजाच्या शब्दासाठीं, धनंजयाच्या अकृत्रिम मैत्रीखातर, मला न शोभणारी दूताची भूमिका घेऊन, युद्धाचा माज चढलेल्या या जिद्दी दुर्योधनाकडे मी आलों आहें. तसें म्हटलें तर, शत्रुसैन्यांतील हत्तींचीं रुंद गंडस्थळें फोडणाऱ्या, तीक्ष्ण गदा धारण करणाऱ्या भीमाच्या—

कृष्णेच्या अपमानांतून उद्‌भवलेल्या–क्रोधाग्नीनें, आणि पार्थाच्या बाणांच्या वादळवाऱ्यांनीं, हा कुरुवंश बांबूच्या वनासारखा जळून गेल्याशिवाय राहणार नाही !....(पाहून) हें दुर्योधनाचें शिबिर. इथें तर देवांच्या नगराप्रमाणें दिसणारे राजेलोकांचे हे डेरे स्वच्छंदानें रचलेले आहेत. शस्त्रागारें विस्तीर्ण असून नाना प्रकारच्या उपकरणांनीं आणि आयुधांनीं खच्चून भरलेलीं आहेत. तबेल्यांतले जातिवंत घोडे खिंकाळत आहेत, तर हत्ती गर्जना करीत आहेत. फांकलें आहे हें ऐश्वर्य ! मात्र स्वजनांच्या अवमानामुळें त्याचा नाश जवळ येऊन ठेपला आहे ! ....अहो ! हा दुर्योधन दुष्ट बोलणारा आहे; सद्‌गुणांचा द्वेषी आहे; शठ आहे; स्वजनांची त्याला कणव नाहीं. माझी भेट घेतल्यावरहि जें करायला हवें तें तो करील असें मुळींच नाहीं. (वळून, उघड) बादरायण ! काय, जायचें का आंत ?

**कांचुकीय** : (धांदलीनें) अर्थात् अर्थात् ! पद्मनाभांनीं चलावें आंत.

[ वासुदेव मंत्रशालेंत पाऊल टाकतो. ]

**वासुदेव** : अरे, अरे ! मला पाहून सर्व क्षत्रियांची धांदल उडाली आहे ! कशाला, कशाला उगीच धांदल करतां ? बसा आपण शांत मनानें.

**दुर्योधन** : (स्वतःशीं) अं ? केशवाला पाहून सर्व क्षत्रिय बावरून गेले अं ? (उघड) असें बावचळल्यासारखें काय करतां ? मघा मीं दंड सुनावला होता, त्याची आठवण राहूं द्या ! इथें माझा हुकूम चालतो आहे म्हटलें !

**वासुदेव** : काय सुयोधना, बसला आहेस ?

**दुर्योधन** : ( बिचकून आसनावरून घसरतो. स्वतःशीं ) केशव आला, यांत शंकाच नाहीं ! उत्साहभरानें बेत योजून मी चांगला मांडी ठोकून बसलों होतों....परंतु केशवाच्या प्रभावा-मुळें घसरलोंच्च शेवटीं आसनावरून ! अहो, महाकपटी आहे हा दूत ! ( उघड ) अरे दूता ! हें आसन. बैस.

**वासुदेव** : आचार्य, बसा ना. गांगेयप्रभृति नृपतिहो ! बसा ना आपण मोकळ्या मनानें. आम्हीहि बसतों. ( बसतो. लक्ष जाऊन ) अरे वा ! सुंदर आहे चित्रपट हा ! पण हे काय ? द्रौपदीच्या केशाकर्षणाचें चित्र रंगविलें आहे यांत ! ( रागीट स्वरानें ) मी म्हणतों—हा सुयोधन बालिश आहे. स्वजनांचा अवमान त्याला पराक्रम वाटतो ! पण या सभासदांमध्यें कोण असा आहे की ज्याला घृणा उरली नाहीं, आणि जो आपण होऊन आपल्या अपराधाचें प्रदर्शन करायला निघाला आहे ? उचला, उचला तो चित्रपट !

**दुर्योधन** : ( नरम पडून ) म्हणतो आहे कीं घेऊन जा चित्रपट, बादरायणा !

**कांचुकीय** : जशी महाराजांची आज्ञा.

[ चित्रपट घेऊन जातो. ]

**दुर्योधन** : अरे दूता ! धर्मात्मज, वायुसुत भीम, देवेंद्राचा पुत्र माझा भाऊ अर्जुन, ते विनीत जुळे बंधु अश्विनीकुमार, सर्वजण आपापल्या परिवारांसह कुशल आहेत ना ?

**वासुदेव** : गांधारीपुत्राला शोभेल असें आतां बोललास ! अर्थात्, अर्थात् ! सर्व कुशल आहेत. तुझ्याहि राज्यांत, त्याच-

प्रमाणें तुझ्या प्रकृतींत आणि अंतःकरणांत कुठें रोगराई नाहीं ना? कुशल आहे ना? युधिष्ठिरादि पांडवांनीं ही पृच्छा केली आहे. आणि त्यांची विनंति आहे कीं, 'आम्हीं फार संकटें सोसलीं! घातलेली अट आतां पूर्ण झाली आहे. पैतृक संपत्तीचा आमचा म्हणून जो न्याय्य वांटा आहे तो आतां विभागून देऊन टाकावा.'

**दुर्योधन :** काय? पैतृक संपत्तीचा वांटा? तो कसा?.... आमचे चुलते वनांत गेले असतां मृगयेच्या प्रसंगानें त्यांच्या हातून अपराध घडला आणि त्यांना ऋषींचा शाप मिळाला. त्या वेळेपासून आपल्या पत्नीशीं त्यांचा संबंध उरला नाहीं. दुसऱ्यांच्या मुलांचें पितृत्व त्यांच्याकडे कसें येईल?

**वासुदेव :** वंशाच्या इतिहासाचा तुमचा फार अभ्यास दिसतो आहे! तुम्हांलाच विचारतों : विचित्रवीर्य आत्यंतिक विषयोप-भोगानें क्षय लागून मरण पावले. त्यानंतर अंबिकेच्या पोटीं व्यासांच्यामुळें हे धृतराष्ट्र जन्माला आले. ते तुमचे जन्मदाते असले तरी राज्यावर त्यांचा काय हक्क आहे? (थांबून) ह्या गोष्टी बोलूं नयेत! अशा रीतीनें आपापसांतील विरोध वाढीला लागला तर राजा, कुरुकुल क्षणार्धांत नामशेष होईल. तेव्हां राग टाकून दे! युधिष्ठिरादि पांडव स्नेहभरानें तुला जें म्हणत आहेत त्याप्रमाणें वागणें हेंच तुला उचित ठरेल.

**दुर्योधन :** अहो दूतमहाशय! राज्यव्यवहार म्हणजे काय हें आपल्याला कळत नाहींसें वाटतें! राजाच्या पोटीं आलेल्या धाडशी पुत्रांनीं शत्रूंना जिंकून जिचा उपयोग घ्यावा अशी राज्य ही चीज आहे! या दुनियेंत राज्याची भीक मागायची

नसते ! आणि भीक मागणाराला तें मिळतहि नसतें ! झटपट राजपद मिळविण्याची त्यांना आकांक्षा असेल तर त्यांनीं पराक्रम करून दाखवावा. नाहींतर मनःशांतीसाठीं शांतमति ज्याचा आसरा घेतात त्या आश्रमांत प्रवेश करायला ते मोकळे आहेतच !

**वासुदेव :** सुयोधना, बंधूंविषयीं असें कठोर बोलणें बरें नव्हे. पुण्यसंचयानें प्राप्त होणारी राजलक्ष्मी हातीं आली असतां जो आपल्या मित्रांची व बांधवांची वंचना करील त्याचा खटाटोप वायां जाईल.

**दुर्योधन :** राजा कंस हा तुझ्या वडिलांचा मेव्हणा—त्याची तुला दया आली नाहीं. मग आमचें नेहमीं अहित करणाऱ्यांची आम्ही कशी दया करावी ?

**वासुदेव :** माझ्यावर त्या घटनेचा दोष लादूं नकोस. माझ्या मातेला अपत्यवियोग करवून त्यानें अनेक वेळां दुःखांत लोटलें. स्वतःच्या वृद्ध पित्याला बंदिवासांत टाकलें....स्वतः मृत्यूनेंच येऊन त्याचा नाश केला, असेंच म्हटलें पाहिजे.

**दुर्योधन :** फसविलेंस, पुरतें फसविलेंस तूं कंसाला ! स्वतःची बढाई गाऊं नकोस ! हें कांहीं शौर्य नव्हे. असें बघ : जांवयाच्या नाशाच्या आपत्तीनें पोळून मगधेश्वर जेव्हां रागानें बेभान झाला तेव्हां भीतीनें घाबरगुंडी उडून पळ काढतांना तुझें तें शौर्य कुठें गेलें होतें ?

**वासुदेव :** सुयोधना, राजनीतीचा मार्ग पत्करणारांना आपल्या शौर्याला देश-काल आणि परिस्थिति यांच्या मर्यादा घालाव्या लागतात. परंतु, माझी थट्टा करणें राहूं दे बाजूला.

स्वतः जें करायला हवें त्याकडे वळलास तर बरें. आपल्या बंधूंशीं स्नेह बाळगावा. दोष विसरून जावेत. बंधूंशीं स्नेहाचा संबंध उभय लोकांत श्रेयस्कर ठरेल.

**दुर्योधन** : ( उपहासानें ) ते तर देवांचे पुत्र ! त्यांचे व आम्हां मनुष्याचें बंधुत्वाचें नातें कसें जुळणार ? ( एकदम उसळून ) झालें हें पिष्टपेषण पुरें झालें ! सोडा गोष्टी !

**वासुदेव** : ( स्वतःशीं ) सामोपचारानें याचें मन वळविण्याचा यत्न केला तरी हा आपला स्वभाव सोडणार नाहीं. ठीक. आतां कठोर शब्दांनीं आणि बोलण्यानें याला भडकवतों. ( उघड ) अरे सुयोधना, अर्जुनाचें सामर्थ्य आणि पराक्रम तूं जाणत नाहींस ?

**दुर्योधन** : नाहीं जाणत !

**वासुदेव** : अस्सें ! ऐक ,मग. किराताचें रूप घेतलेल्या पशुपतीला त्यानें युद्धामध्यें संतुष्ट केलें. अग्नि खांडववनाचें भक्षण करीत असतांना कोसळलेला मुसळधार पाऊस त्यानें बाणांनीं अडवून धरला. देवेंद्राला उपद्रव देणाऱ्या निवातकवचांना त्यानें लीलेनें नष्ट केलें. आणि, तुला आठवत असेल, त्यानें एकट्यानें विराटनगरींत त्या वेळीं भीष्मादिकांचा पण पराभव केला होता !....शिवाय तुझ्या डोळ्यांदेखत घडलेली दुसरी एक गोष्ट सांगतों. चित्रसेन तुला आकाशमार्गानें घेऊन जात असतां जेव्हां तूं आरोळ्या मारल्यास तेव्हां, घोषयात्रेच्या प्रसंगीं, अर्जुनानेंच तुझी सुटका केली होती ! आठवतें कां ?....पण जाऊं दे ! धृतराष्ट्रजा, माझ्या शब्दासाठीं तूं अर्धें राज्य द्यावेंस. नाहीं तर....आसागर पृथ्वीचें पांडव हरण करतील !

**दुर्योधन** : काय, काय? पांडव हरण करतील काय? टोंचून बोलण्याची तुझी हुशारी समजली बरें!....भीमाच्या रूपानें मारूतीनें जरी येऊन युद्धामध्यें प्रहार केला, पार्थाच्या रूपानें प्रत्यक्ष इंद्रानें जरी प्रहार केला, तरी पराक्रमानें रक्षिलेल्या या माझ्या वडिलार्जित राज्यांतील एक गवताची काडीदेखील तुझ्या सांगण्याखातर मी देणार नाहीं!

**वासुदेव** : अरे कुरुकुलकलंका! दुष्कीर्तीचा लोभ सुटला आहे तुला. आमच्यापाशीं गवताची भाषा बोलतोस काय?

**दुर्योधन** : गवळी तूं—तुमच्याशीं गवताचीच भाषा बोलायला पाहिजे! अवध्य अशा स्त्रीला मारून, हयाचा, वृषभाचा आणि मल्लांचा वध करूनहि, तुला एवढीदेखील लज्जा वाटत नाहीं कीं तूं सज्जनाशीं बोलूं इच्छितोस!

**वासुदेव** : सुयोधना! मला अपशब्द बोलतोस?

**दुर्योधन** : भीति आहे काय? बोलण्याच्या लायकीचाहि नाहींस तूं! द्विजवरांनीं आपल्या हातांनीं माझ्या मस्तकावर अभिषेकजलाचें सिंचन केलें आहे. धवल राजछत्र माझ्या शिरावर धरलेलें आहे. राजमंडळ मस्तक नमवून माझ्यामागून येत आहे. तो मी सांगतों आहें कीं तुमच्यासारख्यांशीं मी बोलत नसतों!

**वासुदेव** : (रागानें) सुयोधन माझ्याशीं बोलत नाहीं.... असें काय? बांधवांशीं निःस्नेह झालेल्या अरे शठा, तिरप्या डोळ्याच्या कावळ्या, सर्पा! तुझ्यामुळें या कुरुवंशाचा निःपात हां हां म्हणतां होणार आहे! (एकदम) राजेहो! चाललों आम्ही! (जाऊं लागतों.)

**दुर्योधन** : ( स्वतःशीं ) अरे, खरेंच निघाला हा केशव! ( उघड, ओरडून ) दुःशासन, दुर्मुख, दुर्बुद्धि, दुष्टेश्वर! अरे, दूताच्या शिष्टाचाराचा भंग केला आहे ह्या केशवानें. पकडा त्याला! काय, नाहीं ताकद?....दुःशासना, तुझ्यांतहि सामर्थ्य नाहीं?....हत्ती-घोडे ठार करणारा, कंसाचा वध करणारा हा कृष्ण, पशुपालांच्या कुळांत वाढलेला असल्यानें सम्राटापुढें कसें वागावें हें त्याला कळत नाहीं! आपल्याच बोलांनीं तो दोषाचा धनी झाला आहे. सर्व राजांच्या देखत त्याच्या बाहुबलाचें आणि पराक्रमाचें हरण करून बांधा त्याला लौकर!....यांच्यांत ताकद नाहीं!....मामा, बांधा ह्या केशवाला. काय, तोंड फिरवून हेहि कोसळले? ठीक, मीच पाश घेतों अन् बांधतों.

( कृष्णाजवळ जातो. )

**वासुदेव** : ( स्वतःशीं ) काय? मला पकडण्याचा सुयोधनाचा बेत आहे काय? ठीक.......पाहतोंच सुयोधनाचें सामर्थ्य!

[ विश्वरूपाचा आविष्कार करतो. ]

**दुर्योधन** : अरे दूता! तूं जरी देवांची माया किंवा स्वतःची माया आसमंतांत निर्माण केलीस, ज्यांचे वार चुकविणें मुष्कील अशा देवांच्या अस्त्रांनीं जरी तूं प्रहार केलास, हय, हत्ती, वृषभ यांच्या वधानें तूं चढून गेलेला असलास, तरी हा राजगण भोंवतीं असतांना तुला बांधल्याशिवाय मी आज रहात नाहीं! थांब आतां! अं? केशव दिसत कसा नाहीं? अरे हा केशव! किती लहान दिसतो आहे केशव! उभा राहा आतां. अं? केशव दिसेनासा झाला! हा पाहा केशव! बापरे, केवढा मोठा झाला आहे केशव! दिसत कसा नाहीं केशव? हा केशव

पाहा ! मंत्रशालेंत सगळीकडे केशवच केशव झाले आहेत ! आतां काय करूं मी ?........असेंच. अहो राजेहो ! तुम्ही एकेका केशवाला पकडा. हें काय ? स्वतःच पाशांनीं बांधले जाऊन कोसळताहेत हे ! शाबास चेटक्या, शाबास ! !........ माझ्या धनुष्याच्या उदरांतून बाहेर पडलेल्या असंख्य बाणांनीं जखमी होऊन गळणाऱ्या रक्तानें सर्वांग रंगून निघाल्यावर तुला जेव्हां शिबिराकडे घेऊन जातील तेव्हां अश्रुभरल्या डोळ्यांनीं दीर्घ उसासे टाकीत पांडवांना तुला पाहूंच देत !

[ आवेगानें निघून जातो. ]

**वासुदेव :** मला वाटतें, पांडवांचें कार्य मीच पुरें करून टाकावें. ( अंतराळांत पाहात ) सुदर्शना, इकडे ये बरें.

[ सुदर्शन प्रवेश करतो. ]

**सुदर्शन :** अहो, हा मी भगवंतांची वाणी ऐकून, आड येणाऱ्या मेघांचा ओघ त्यांच्या अलोट प्रसादामुळें बाजूला सारीत धावत येऊन ठेपलों आहें ! कमलनयनांचा कोणावर एवढा कोप झाला आहे बरें ? कोणाच्या मस्तकावर मी माझी शक्ति प्रकट करावयाची आहे ? ( इकडे तिकडे पाहात ) अव्यक्त प्रकृतीचें मूळ कारण, ज्यांचें स्वरूप अचिंत्य आहे, जगताच्या संरक्षणासाठीं जे तत्पर आहेत, एक असूनहि ज्यांनीं अनेक रूपें धारण केलीं आहेत, आणि वैऱ्यांच्या सामर्थ्याचा ज्यांनीं चुराडा केला आहे ते लक्ष्मीसहित भगवान् नारायण कुठें असतील बरें ? ( पाहून ) अरे, हे भगवंत हस्तिनापुराच्या द्वाराजवळ दूताची भूमिका घेऊन आले आहेत ! ( धांदलीनें ) पाणी कुठें आहे ? पाणी कुठें आहे ? स्वर्गीय आकाशगंगे, पाणी—लौकर !

धन्य, स्रवूं लागली ! ( आचमन करून, वासुदेवाजवळ भक्ति-भावानें जात ) जय भगवान् नारायण !

( लवून वंदन करतो. )

**वासुदेव :** सुदर्शना, तुझा पराक्रम अप्रतिहत असो !

**सुदर्शन :** अनुग्रह झाला माझ्यावर.

**वासुदेव :** कामाच्या वेळीं हजर झालास याचा मला आनंद आहे.

**सुदर्शन :** कामाच्या वेळीं म्हणालांत ? तें कसें ? आज्ञा करा भगवंता, आज्ञा करा !.......मेरुमंदारादि समस्त पर्वतांना गरगरा फिरवूं ? कां महासागर खवळवूं ? सर्व नक्षत्रांची माळ पृथ्वीवर पाडूं ? देवा, तुमची कृपा असल्यावर मला अशक्य कांहींच नाहीं.

**वासुदेव :** सुदर्शना, इकडे ये. ( अवकाशांत पाहात ) अरे सुयोधना ! सागरांत, पर्वताच्या गुहेमध्यें, अथवा ग्रहगण ज्यांतून भ्रमण करतात त्या वायुमार्गांत जरी तूं दडून बसलास तरी हे पळपुट्या, माझ्या बाहुबलाचा संपर्क लाभून वेगवान् बनलेलें हें चक्र कालचक्राप्रमाणें तुला गांठील !

**सुदर्शन :** अरे क्षुद्रा सुयोधना–( थांबून, पुन्हां विचार करून ) प्रसन्न व्हा, भगवान् नारायणा ! पृथ्वीचा भार दूर करण्यासाठीं तुम्ही भूतलावर अवतार घेतलात. हा जर असाच मेला तर अवतार घेण्याचे श्रम व्यर्थ म्हणावे लागतील, देवा !

**वासुदेव :** सुदर्शना, रागाच्या भरांत ही उचित गोष्ट मला सुचली नाहीं. बरें, जा तूं आपल्या निवासस्थानीं.

**सुदर्शन** : जशी भगवान नारायणांची आज्ञा ! ( जाण्याच्या तयारींत........खालीं कौरवसमुदायाकडे पाहात ) काय, काय म्हणालांत ? गोपाल ? तीन पावलांत तिन्ही लोक व्यापून टाकणारे वंदनीय नारायण आहेत हे ! तुम्ही शरण जाणेंच उचित होईल ! बरें, निघतों मी.

( थबकून पाहात ) अरे, भगवंताचें श्रेष्ठ आयुध हें शार्ङ्गधनुष्य येऊन ठेपलें—बारीक, लवलवणाऱ्या आणि बांकदार काठीमुळें स्त्रीस्वभावाशीं मिळणाऱ्या ह्या धनुष्याचा मध्य हरीनें हातांत धरला म्हणजे हें शत्रुसैन्याचा साक्षात् काळ बनतें ! ह्याचा पृष्ठभाग सुवर्णानें मढविलेला असल्यानें कृष्णाच्या पाठीशीं हें उभें असलें म्हणजे पावसाळ्यांतील नवमेघाच्या पाठीशीं सुंदर विद्युल्लता उभी असल्यासारखें दिसतें !....अरे अरे ! भगवान नारायणाचा क्रोध शांत झाला. आपल्या निवासाकडेच परत फीर. छान, निघालें. मीहि निघतों....

अरे, ही कौमोदकी गदा आली ! रत्नांच्या व सुवर्णाच्या विविध रंगांत रंगलेली, रंगीबेरंगी फुलांनीं आच्छादलेली ही गदा सुरशत्रूंच्या गात्रांचा चुराडा करायला आसुसलेली असते ! महान् पर्वताच्या कड्याप्रमाणें दिसणारी, अत्यंत शक्तिशाली आणि दुर्निवार अशी ही, मेघांचे पुंज पाठीशीं ओढीत आकाशांतून वेगानें निघाली आहे. कौमोदकी, भगवान नारायणांचा क्रोध शांत झाला आहे ! बरें झालें, ही परतली. मीहि चलतों....

अरे वा ! जो पूर्णचंद्र, कुन्द, श्वेतकमलाचा गाभा आणि मौक्तिक यांच्याप्रमाणें गौर असून, नारायणांच्या मुखकमलाचा प्रसाद ज्याला मिळतो, ज्याचा प्रलयसागराच्या गर्जनेप्रमाणें

असणारा नाद ऐकून असुरस्त्रियांचें गर्भपतन होतें—तो हा पांचजन्य दाखल झाला आहे ! पांचजन्या, भगवंतांचा क्रोध शमला आहे. जा. ठीक.... निघाला !....

अरे, ही नंदक तलवार येऊन ठेपली ! स्त्रीसारखी बाकदार आकृति असलेली ही तलवार युद्धांमध्यें प्रचंड असुरांनाहि भय उत्पन्न करते. आकाशांतून ही वेगानें निघाली आहे आणि प्रचंड उल्केप्रमाणें तळपते आहे. नंदक, भगवंताचा राग मावळला आहे. जा. छान, परतली ! आतां मीहि निघावें.....

अरे, हीं भगवंतांचीं आयुधें—ही ती नंदक नांवाची तलवार—जिच्या अंगच्या किरणांनीं प्रखर रवीचें तेजहि फिकें पडतें ! सुरशत्रूंचीं चिवट, रुंद, वक्षःस्थलें फोडण्यांत दक्ष असलेली ही ती कौमोदकी गदा ! हें तें शार्ङ्ग नांवाचें बाकदार चाप—ज्याच्या दोरीचा आवाज प्रलयमेघांच्या कडकडाटासारखा आहे ! आणि हा तो गंभीर घोष करणारा, चंद्रकिरणाप्रमाणें धवल, शंखराज पांचजन्य ! .... हे शार्ङ्गा, कौमोदकी, पांचजन्या ! दैत्यांचा अंत करणाऱ्या, वैऱ्यांना प्रत्यक्ष अग्नि वाटणाऱ्या नंदका ! भगवान मुरारींचा क्रोध शांत झाला आहे. तेव्हां आपापल्या स्थानींच चलावें. छान—गेले सगळे ! मीहि जातों आतां.....

अं ? हा प्रचंड वारा सुटला आहे....जाळणाऱ्या तेजानें सूर्य तळपूं लागला आहे....पर्वत हादरले....सागर खवळले....वृक्ष मोडून पडले....मेघ सैरावैरा धावूं लागले....वासुकीप्रभृति महाभुजंग तोंड लपवूं लागले ! ! अरे, हें आहे तरी काय ? वा ! हा गरुड–भगवंतांचें वाहन–येऊन ठेपला आहे ! ज्यानें देवदानवांच्या परिश्रमानें हातीं आलेलें अमृत आपल्या

मातेच्या सुटकेसाठीं शत्रूंच्या हातून हिसकून घेतलें आणि 'मी तुला वाहन करीन' असा वरहि मुरारीपासून ज्यानें मिळवून घेतला—तो हा! काश्यपाच्या प्रिय पुत्रा, गरुडा! देवदेवेश भगवंताचा क्रोध शांत झाला आहे बरें! आपल्या निवासस्थानीं जा कसा! बरें झालें, परतला. आतां मी जातों....

ही देव–सिद्ध–यक्ष–किन्नरादि मंडळी अच्युतांचा कोप झाल्याचें कळतांच बावरून गेली होती; त्यांच्या मस्तकावरचे मुकुट सरकले होते; तेज मावळलें होतें. आतां शांत झाल्याचें ऐकून त्यांचा ताप ओसरला आहे आणि ते आपापल्या निवासस्थानीं गेले आहेत. तेव्हां मीहि मेरुपर्वताच्या रम्य गुहेंत जातों.

[ सुदर्शन जातो. ]

**वासुदेव** : मीहि आतां पांडवांच्या शिबिराकडे जातों.

[ पडद्याआड ]

जाऊं नका! जाऊं नका!

**वासुदेव** : अरे, वृद्ध राजाचा तर हा स्वर नव्हे? राजन्, हा मी थांबलों आहें पाहा.

[ धृतराष्ट्र प्रवेश करतो. ]

**धृतराष्ट्र** : कुठें आहेत भगवान नारायण? पांडवांचें श्रेय संपादणारे, विप्रजनांना प्रिय, देवकीनंदन भगवान कुठें आहेत, कुठें आहेत, कुठें आहेत? शार्ङ्गधरा, त्रिदशाध्यक्षा! माझ्या पुत्राच्या अपराधांची क्षमा मागण्यासाठी माझें हें मस्तक तुझ्या पायाशीं लवलें आहे!

**वासुदेव** : (गडबडीनें) अरे! हें काय? वांकलांत आपण? उठा, उठा!

**धृतराष्ट्र** : अनुग्रह झाला. ( उठून ) भगवंता, हा अर्घ्य.... हें पादोदक. यांचा स्वीकार करावा.

**वासुदेव** : सर्व स्वीकारतों. मला आणखी कांहीं प्रिय करतां येईल का ?

**धृतराष्ट्र** : भगवंत माझ्यावर प्रसन्न असले तर मला आणखी काय हवें ?

**वासुदेव** : ठीक आहे. आपण पुन्हां भेटूं.

**धृतराष्ट्र** : जशी भगवान नारायणांची आज्ञा.

[ धृतराष्ट्र जातो. वासुदेवहि जातो. हळुहळूं सर्व दृश्य विलीन होतें. ]

* * *

३



# दूत घटोत्कच

## पात्रें

( प्रवेशानुक्रमानें )

सैनिक ( जयत्रात )
प्रतीहारी
धृतराष्ट्र
गांधारी
दुःशला
दुर्योधन
दुःशासन
शकुनि
घटोत्कच

**[ हस्तिनापुरांतील कौरवांच्या अंतःपुराजवळचा महाल. एक सैनिक प्रवेश करतो आणि प्रवेशद्वाराजवळ मोठ्यानें हांक मारून बोलतो. ]**

**सैनिक :** अहोहो ! शंभर पुत्रांच्यामुळें ज्यांचा आप्तपरिवार गौरवाला चढला आहे, ज्ञानीपणामुळें ज्यांचा विनयशील आचार वृद्धिंगत झाला असून जे दूरदृष्टि आहेत, त्या महाराज धृतराष्ट्रांना एवढा निरोप कळवा : ' योद्धे, रथ, घोडे आणि हत्ती ठार करून ज्यानें राजसैन्यामध्यें खळबळाट माजविला, समरांगणावर खेळ खेळावा तद्वत् ज्यानें बाल असूनहि अर्जुनाला शोभणारा पराक्रम केला, त्या सौभद्राला—सर्व बाजूनीं वेगानें धांवून आलेल्या राजांनीं युद्धभूमीवर वेढलें आणि क्षणार्धांत स्वर्गांत त्याच्या आजोबाच्या—इंद्राच्या मांडीवर त्याला नेऊन बसविलें !

[ प्रतीहारी—द्वारपालिका—येऊन दार उघडते. महालाचें दृश्य. धृतराष्ट्र, गांधारी व दुःशला यांचा प्रवेश. प्रतीहारी सैनिकाला घेऊन येते व निरोप देते. ]

**धृतराष्ट्र :** अरे, याचा अर्थ काय ? कोणीं माझे कान किटवले ? प्रियनिवेदनाचें निमित्त करून कोण मला हें अप्रिय सांगत आहे ? शिशुवधाच्या पातकानें लडबडलेल्या आमच्या वंशाच्या क्षयाची घोषणा कोण करीत आहे ? त्याला भीति वाटली नाहीं ?

**गांधारी :** महाराज, कुलांचें वैर माजवून पुत्रविनाश होईल अशी परिस्थिति आहे, कीं आपला तर्क आहे ?

**धृतराष्ट्र :** गांधारी, सध्यां तरी तर्क म्हणूं या.

**गांधारी :** महाराज, खरा अर्थ केव्हां कळेल ?

**धृतराष्ट्र** : ऐक गांधारी ! अभिमन्यूच्या निधनानें उसळलेल्या रागामुळें, आपल्या उग्र धनुष्याचें साहाय्य घेऊन, चिडलेल्या कृष्णानें लगाम व चाबूक हातीं घेतल्यावर, पार्थाच्या हातून तें कृत्य घडेल—ज्यामुळें या जगाचा विनाश ओढवून सगळें सामसूम होईल !

**गांधारी** : हाय रे बाळ अभिमन्यु ! पुरुषांचा नाश करणारा हा भयंकर कुलसंग्राम एकीकडे चालू असतांना आम्हांला बालका-प्रमाणें रडवीत ठेवून तूं आणखी कुठें निघून गेला आहेस, बाळ ? असें कसें आमचें दुर्भाग्य !

**दुःशला** : ज्यानें आज सौभाग्यसंपन्न उत्तरेला वैधव्य आणलें त्यानें आपल्या सौभाग्यवतीसाठीं वैधव्याला पाचारण केलें असें म्हटलें पाहिजे !

**धृतराष्ट्र** : मला हें सांगा, या संकटाच्या सागराला कोणीं सेतु बांधला ?

**सैनिक** : महाराज, मी जयत्रात नव्हे का ?

**धृतराष्ट्र** : जयत्रात, अभिमन्यूला कोणीं मारलें ? कोणाला आपल्या जीविताचा कंटाळा आला आहे ? पांडवांच्या पंचाग्नी-मध्यें कोणीं स्वतःचें जळण केलें आहे ?

**सैनिक** : महाराज बातमी अशी आहे कीं, अनेक राजांनीं एकत्र येऊन अभिमन्यूला मारलें. परंतु जयद्रथ निमित्त झाले असावेत !

**धृतराष्ट्र** : दुर्दैवा ! काय, जयद्रथ निमित्त झाला ?

**सैनिक** : महाराज, असें म्हणायला हरकत नाहीं.

**धृतराष्ट्र :** अरेरे ! जयद्रथ ठार झाला !

[ तें ऐकून दुःशला रडूं लागते. ]

**धृतराष्ट्र :** कोण ही रडते आहे ?

**प्रतीहारी :** महाराज, राजकुमारी दुःशला.

**धृतराष्ट्र :** बाळे, उगी ! रडूं नको ! मला असें दिसतें आहे कीं, तुला चिरकाल सौभाग्यदशा असावी हें तुझ्या पतीला रुचत नाहीं ! म्हणून त्यानें आपण होऊन स्वतःला अर्जुनाच्या बाणांचें लक्ष्य करून घेतलें !

**दुःशला :** असें असेल बाबा, तर मला परवानगी द्या. मीहि उत्तरेच्याकडे जातें.

**धृतराष्ट्र :** जाऊन तूं काय म्हणणार तिला ?

**दुःशला :** बाबा, मी तिला म्हणेन की, ' तूं जो वेष आज धारण केला आहेस तो मी पण अंगावर चढवितें. '

**गांधारी :** ( आवेगानें ) मुली ! कसें, कसें अमंगल बोलते आहेस ! तुझा नवरा जिवंत आहे म्हटलें.

**दुःशला :** ( निराशेनें ) आई, माझें एवढें भाग्य कुठून असणार ? ज्यांना जनार्दनांचें साहाय्य आहे त्या अर्जुनांना दुखविल्यावर कोण जिवंत राहूं शकणार आहे ?

**धृतराष्ट्र :** दुर्दैवी दुःशला बोलली तें खरें आहे. कारण, अष्टभुजांच्या उशा करून कृष्णानें आपल्या मांडीवर ज्याला दीर्घकाल वाढविलें, वारुणीचा मद चढलेल्या बलरामाला प्रीती-मुळें जो दुसरा मद झाला, देवांच्या पराक्रमाची बरोबरी करणाऱ्या पांडवांच्या प्रेमाचें जो एकनिधान, त्याला ठार केल्यावर, स्वतः दुष्कृत्याचा ढीग रचल्यावर, कोण या पृथ्वीवर

जिवंत राहूं शकणार आहे ? ( निःश्वास टाकून ) जयत्रात, पुत्राची मरणावस्था पाहून अर्जुनानें काय केलें ?

**सैनिक :** महाराज, अर्जुन जवळ असतांना हें कृत्य घडलें असें तुम्हांला वाटतें ?

**धृतराष्ट्र :** काय, अर्जुन त्या वेळीं जवळ नव्हता ?

**सैनिक :** नव्हते, महाराज.

**धृतराष्ट्र :** मग हा बनाव घडला तरी कसा ?

**सैनिक :** ऐकावें. संशप्तकाच्या सैन्याशीं लढण्यासाठीं जनार्दनासमवेत धनंजय निघून गेल्यावर कुमार अभिमन्यूनें समरांगणांत उडी घेतली—बालवयामुळें तसें करतांना त्याला शंकासुद्धां आली नाहीं.

**धृतराष्ट्र :** ( निसासून ) हं....त्याचा वध झाला यांत नवल नाहीं ! ( थांबून ) सिंह गुहेंत असतांना हल्ला करायला कोण धजावेल ! बरें, असें सांग, बाकीचे पांडव काय करीत आहेत ?

**सैनिक :** ऐकावें महाराज ! अर्जुनाला दर्शन घेतां यावें म्हणून त्याचा देह त्यांनीं हातांनीं उचलून अजून चितेवर ठेवला नाहीं. ज्या ज्या राजांनीं त्याच्या शरीरावर प्रहार केले त्या राजांचीं नांवें घेत ते बसले आहेत.

**धृतराष्ट्र :** ( एकदम ) गांधारी, चल. गंगेच्या तीरावर जाऊं या.

**गांधारी :** महाराज, तिथें जाऊन स्नान करायचें ना ?

**धृतराष्ट्र :** ऐक गांधारी ! स्वतःच्या अपराधांनीं मृत्युमुखीं पडलेल्या तुझ्या मुलांना पाणी देऊन मी आजच मोकळा होतों !

अर्थात् तिलांजली देऊनहि राजांच्या युद्धशिबिराला अटकाव करण्याची शक्ति मला येईल, असें मात्र नाहीं !

[ सर्व निघण्याच्या तयारींत आहेत, तेवढ्यांत दुर्योधन, दुःशासन आणि शकुनि प्रवेश करतात. ]

**दुर्योधन** : प्रिय दुःशासना ! अभिमन्यूच्या निधनानें विरोध स्थिरावला आहे. आपल्याला जय मिळून शत्रू हादरले आहेत, परास्त झाले आहेत. ह्या मधुसूदनाचा गर्व समूळ उखडून गेला आहे. उत्कर्षाबरोबर कीर्तिहि आज माझ्या वांट्याला आली आहे !

**दुःशासन** : आणि दुसरें हें नाहीं कां ? जयद्रथाच्या सैन्यानें शत्रुसेनेवर आक्रमण करून दुसरा अर्जुनच अशा सौभद्राला शेकडों बाणांच्या फेकींनीं खालीं पाडलें त्या वेळीं पांडव अडकलेले राहिले. भीष्म पडल्यामुळें आज युद्धामध्यें आमच्यावर संकटाची परंपरा कोसळली होती....पण याच वेळीं पुत्राच्या वधानें आम्हीं त्यांच्या अंतःकरणांत शोकाचे तीक्ष्ण बाण घुसवले आहेत !

**शकुनि** : जयद्रथानें आज रण गाजवलें ! त्याच्या अंगीं एवढा पराक्रम असेल अशी राजेलोकांना कल्पनाहि झाली नसेल ! ज़ोराचा हल्ला चढवून त्यानें ऐन लढाईत पांडवांचा पुत्र नेला आणि त्याचबरोबर त्यांचें अप्रतिम यशहि हिरावून नेलें.

**दुर्योधन** : मामा, चला. दुःशासन, चल. बाबांच्याकडे जाऊं आणि त्यांना अभिवादन करूं.

**शकुनि** : प्रिय दुर्योधना ! मला वाटतें, नको. हें कुलयुद्ध त्यांना पसंत नाहीं हें कबूल केलेंच पाहिजे. शिवाय, पांडवां-विषयीं त्यांना ममत्व आहे; त्यामुळें ते आपल्याला ठपका देत

असतातच. तेव्हां जय मिळविल्यामुळें प्रफुल्लित चेहरे करून युद्धभूमीवरून उठून सरळ त्यांच्याकडे जाणें उचित होईल का ?

**दुर्योधन :** मामा, असें कां म्हणतां ? जें व्हायचें असेल तें होईल. आपण आपले जाऊन बाबांना अभिवादन करूं.

**दोघे :** ठीक आहे.

[ तिघे धृतराष्ट्राजवळ येतात. ]

**दुर्योधन :** बाबा, हा दुर्योधन अभिवादन करीत आहे.

**दुःशासन :** बाबा, हा दुःशासन अभिवादन करीत आहे.

**शकुनि :** मी शकुनि अभिवादन करतों.

**सर्वजण :** हें काय ? आशीर्वचन कसें उच्चारीत नाही ?

**धृतराष्ट्र :** मुला, कसें उच्चारूं आशीर्वचन ? अर्जुनाचा आणि कृष्णाचा प्राण अशा बाळ सौभद्राला मारल्यावर आम्हीं जीविताची आशा कशी धरावी ? आणि आशीर्वाद तरी कसा उमटावा ?

**दुर्योधन :** असें भय वाटण्याचें कारण, बाबा ?

**धृतराष्ट्र :** हें भय वाटण्याचें कारण विचारतोस ? अनेक पुत्रांनीं सनाथ झालेल्या या कुलामध्यें एकच मुलगी जन्माला आली होती....आणि म्हणून शंभर पुत्रापेक्षां ती प्रिय वाटत होती. तुम्हां भावांच्या कृपेमुळें अश्लाघ्य असें वैधव्य तिला प्राप्त होणार—हें कारण !

**दुर्योधन :** बाबा, जयद्रथाचा यांत काय संबंध ?

**धृतराष्ट्र :** त्या दीडशहाण्यानें पांडवांचा कोंडमारा केला असें ऐकलें मीं.

**दुर्योधन** : म्हणे त्यानें कोंडमारा केला! इतरहि पुष्कळ होते कीं!

**धृतराष्ट्र** : अरे, म्हणजे आणखी वाईट! अनेक निर्घृण आत्मे एकत्र होऊन त्यांनीं मिळून पुत्रवत् कोंवळ्या पोरावर प्रहार केले तेव्हां त्यांचे हात गळून कसे पडले नाहींत?

**दुर्योधन** : (उसळून) बाबा! वृद्ध भीष्मांना कपटानें मारतांना त्यांचे हात गळून पडले नाहीत! मग पराक्रमांत कोंवळा पोर नसलेल्या त्याला मारतांना आमचे हात कां म्हणून गळून पडावेत?

**धृतराष्ट्र** : मुला, भीष्मांना मारणें आणि अभिमन्यूचा वध करणें या दोन्ही गोष्टी सारख्याच आहेत?

**दुर्योधन** : नाहींत का सारख्या?

**धृतराष्ट्र** : ऐक मुला! भीष्म स्वच्छंदमरणी होते; त्यांच्या सूचनेप्रमाणें त्यांना मरण आलें; त्यांत त्यांना समाधान लाभलें होतें. परंतु हा कोंवळा पोर; कुरुवंशाचा त्राता; अर्जुनाचा पहिला अंकुर होता.

**दुःशासन** : बाबा, तो पोर असला तरी पोर नव्हता. अभिमन्यूनें—

**धृतराष्ट्र** : (मध्येंच) कोण? हा दुःशासन बोलतो आहे का?

**दुःशासन** : हो! आम्हां सर्वांच्या डोळ्यांदेखत, आम्ही प्रत्यक्ष लढत असतां, त्यानें खेचून खेचून तापलेलें धनुष्य हातांत घेतलें, आणि—सूर्यानें आपल्या भिडणाऱ्या किरणांनीं खुणा उमटवाव्यात तसें—त्यानें आपल्या बाणांनीं सर्व राजांच्या अंगावर खुणा वठवल्या.

**धृतराष्ट्र :** अरेरे ! अरे, एकट्या बाळ सौभद्रानें जर एवढें केलें तर पुत्रनिधनानें संतापलेला पार्थ तुमची काय दशा करील !

**दुर्योधन :** काय दशा करील ?

**धृतराष्ट्र :** काय करील तें तुम्ही पाहालच—जिवंत राहिलांत तर !

**दुर्योधन :** ( रागानें ) बाबा ! कोण आला हा अर्जुन मोठा ?

**धृतराष्ट्र :** मुला, तूं अर्जुनाला ओळखत नाहींस अजून ?

**दुर्योधन :** ( चिडून ) नाहीं ओळखत बाबा !

**धृतराष्ट्र :** अस्सें ? मग मीहि नाहीं ओळखत ! पण अर्जुनाचें सामर्थ्य आणि पराक्रम जाणणारे लोक अनेक आहेत. त्यांना विचार.

**दुर्योधन :** बाबा, कोण अर्जुनाचें सामर्थ्य अन् पराक्रम जाणणारे आहेत, ज्यांना विचारूं ?

**धृतराष्ट्र :** ऐक मुला ! मागें निवातकवच दैत्यांच्या प्राणांचा नजराणा देऊन ज्याला पूजिलें त्या इंद्राला जाऊन विचार ! विविध अस्त्रांनीं संतुष्ट केलेल्या किरातरूपी शंकराला विचार ! सर्पांच्या आहुतीची लालसा असलेल्या ज्या अग्नीला खांडवदाहाच्या वेळीं संतुष्ट केलें त्याला विचार ! दैवी विद्येचें संरक्षण असलेल्या ज्या चित्रांगदानें अलीकडे तुला पकडून नेलें होतें त्याला विचार !

**दुर्योधन :** अर्जुनाशीं सामना देणारे वीर आमच्या सैन्यांत नाहींत असें तुम्हांला वाटतें ?

**धृतराष्ट्र** : मुला, कोण ते ?

**दुर्योधन** : उदाहरणार्थ, कर्ण.

**धृतराष्ट्र** : बिचारा कर्ण ! स्वतःचें हसें करून घेईल !

**दुर्योधन** : ( चिडून ) म्हणजे काय ?

**धृतराष्ट्र** : ऐक : इंद्रानें ज्याचें कवच हिरावून नेलें, ज्याचा अर्धाच रथ उरला, आणि कपट करून मिळविलेलें ज्याचें अस्त्रबल निष्फळ झालें—अशा घोडचुका करणाऱ्या ह्या कर्णाची कींवच करायला पाहिजे. अग्नि, इंद्र आणि रुद्र यांनीं येऊन जरी अस्त्रें दिलीं तरी कर्ण अर्जुनाच्या बरोबरीला येईल काय ?

**शकुनि** : आम्हांला टाकून बोलण्याचा आपल्याला अधिकारच आहे !

**धृतराष्ट्र** : शकुनि बोलतो आहे ना ? शकुनि, पट्टीचा जुगारी तूं ! तूं जें कृत्य केलेंस त्यानें उद्‌भवलेला दोन कुलांतला हा वैराग्नि पोरांच्यापर्यंत आला तरी अजून शांत होत नाहीं !

[ पडद्याआड : प्रचंड आवाज ]

**दुर्योधन** : अरे ! कडकड आवाज करीत हा भूकंप एकाएकीं कशामुळें झाला ? तुटून पडणाऱ्या उल्कांनीं आकाश जणुं उजळून निघालें आहे !

**धृतराष्ट्र** : मुला, मला वाटतें कीं धडधडीत आपल्या नातवाला ठार झालेलें पाहून कासावीस हृदय झालेल्या महेन्द्राचीं हीं आसवें उल्कांच्या रूपानें पडत आहेत !

[ पडद्याआड : मोठा संमिश्र आवाज ]

**दुर्योधन :** जयत्रात, जा आणि पांडवांच्या शिबिरांत शंख, दुंदुभि सिंहनाद यांच्यांत मिसळलेला हा आवाज कशामुळें होतो आहे तें पाहून ये.

**सैनिक :** जशी आज्ञा.

[सैनिक जातो व क्षणभरानें परत येतो.]

**सैनिक :** जय हो महाराज ! असें समजतें कीं संशतकाच्या सेनेनें एका बाजूला नेलेला अर्जुन परतला, त्यानें आपल्या मृत पुत्राला मांडीवर घेतलें, त्यावर अश्रूंचा अभिषेक धरला, आणि जनार्दन नको नको म्हणत असतांहि प्रतिज्ञा केली—

**दुर्योधन :** काय—काय ?

**सैनिक :** त्याच्या प्रतिज्ञेनें हृदय संतुष्ट होऊन, त्याच्या पराक्रमानें स्फूर्ति मिळून, प्रफुल्लित वदन झालेल्या सर्व राजांनीं ' आतां जय आमचाच ', अशी खात्री वाटून एकाएकीं हर्ष-भरानें गर्जना केली. व पृथ्वीचा तोल सांभाळणाऱ्या प्रचंड पर्वतांनीं, गदगदा हलविल्यावर, पृथ्वीवर आडवें पडावें त्याप्रमाणें, खवळलेले राजे चालून जातांच, ही पृथ्वी ब्ावर-लेल्या तरुणीप्रमाणें त्या क्षणीं थरथरा कांपली !

**धृतराष्ट्र :** प्रतिज्ञेच्या नुसत्या घोषानें ही पृथ्वी कंपित झाली ! मग धनुष्याला हात घातल्यावर त्रैलोक्याला हादरा बसेल हें उघड आहे !

**दुर्योधन :** ( चिडून, उतावीळपणें ) जयत्रात, प्रतिज्ञा काय केली त्यानें ?

**सैनिक :** ' ज्यानें माझ्या पुत्राला मारलें, तो पडल्यावर ज्यांना आनंद झाला, त्या सर्वांना उद्यां सूर्यास्त व्हायच्या आंत मी ठार करीन ! '

**दुर्योधन** : आणि प्रतिज्ञेचा भंग झाला तर प्रायश्चित्त ?

**सैनिक** : गांडीव धनुष्य बरोबर घेऊन चितारोहण !

**दुर्योधन** : ( आनंदानें ओरडत ) मामा, चितारोहण चितारोहण ! दुःशासना, चितारोहण चितारोहण !! ( एकदम ) त्याच्या प्रतिज्ञेला अडथळा येईल असा प्रयत्न आतां आपण आपल्या परीनें केला पाहिजे.

**धृतराष्ट्र** : मुला, काय करशील तूं ?

**दुर्योधन** : कां ? सर्व अक्षौहिणींचा डोंगर रचून जयद्रथाला झाकून ठेवीन ! शिवाय, द्रोणांच्या सल्ल्याप्रमाणें काय वाटेल तें करून मी असा व्यूह रचीन कीं ज्याचा भेद अशक्य होईल. म्हणजे मग इच्छा पुरी न झाल्यामुळें त्यांचें हृदय खिन्न होईल ! आणि तें, त्यांचे हत्ती, त्यांचे योद्धे—सारेच अग्नि-प्रवेश करतील !

**धृतराष्ट्र** : ( हसून ) जयद्रथ पृथ्वीच्या पोटांत दडून बसला किंवा आकाशांत जाऊन राहिला तरी जोंवर कृष्णाचे डोळे अर्जुनाच्या साहाय्याला आहेत तोंवर अर्जुनाचे बाण तुझा सर्वत्र पाठलाग करतील !

[ दुर्योधन खवळून उठतो. शकुनि व दुःशासन त्याला आवरतात. ]

**सैनिक** : ( स्वतःशीं ) नित्य सत्ता गाजविणाऱ्या ह्या राजाला अशा निष्ठुरपणें दुसरा कोणी बोलला असता तर तो या क्षणीं जिवंत कांहीं राहिला नसता !

[ आकाश मार्गानें घटोत्कच प्रवेश करतो. ]

**घटोत्कच :** अहो सौभद्राच्या विनाशामुळें माझी पाठवणी केली आहे; रानटी मन असलेल्या शत्रूला भेटण्याच्या इच्छेनें मी निघालों आहें. अंकुशाची भीति मनांत बाळगून गजेन्द्रानें भक्ष्याचा विचार करावा तसा मी चक्रधारी कृष्णांच्या हुकुमाचा विचार करतों आहें ! (खालीं पाहात) हें यांच्या निवासस्थानाचें प्रवेशद्वार दिसतें. उतरावें खालीं. (खालीं उतरून) आल्याची बातमी स्वतःच सांगतों. (घोषणा करीत) अहो ! मी हिडिंबेचा पुत्र घटोत्कच यदुपतीचा निरोप घेऊन आलों आहें. स्वतः केलेल्या अपराधामुळें शत्रु बनलेल्या वडिलांना मला भेटावयाचें आहे.

**दुर्योधन :** (पुढें होऊन) ये, ये. ह्या शत्रुभुवनांत ये ! मलाहि खूप उत्सुकता आहे. अगदीं धीटपणें जनार्दनाचा निरोप सांग. हा मी दुर्योधन इथें उभा आहें !

**घटोत्कच :** (आंत प्रवेश करून) अरे, पूज्य धृतराष्ट्र आजोबा इथेंच आहेत. (स्वतःशीं) शंभर रानवटांचे जन्मदाते ! पण यांची वैशिष्ट्यपूर्ण आकृति किती सुंदर अन् गंभीर आहे ! केवढें आश्चर्य ! वृद्ध असूनहि कुठें मुरकुती नाहीं. खांदे भरीव अन् घट्ट आहेत. शंभर पुत्रांचें धाडस पाठीशीं असल्यामुळें विश्वास वाटावा, अशी यांची आकृति दिसते. मला वाटतें, स्वर्गाचें रक्षण कसें होणार अशी शंका वाटून देवांनीं भीतीमुळेंच यांना अंध करून जन्माला घातलें असावें ! (जवळ जाऊन, उघड) आजोबा, मी घटोत्कच वंदन— (एकदम थांबून) छे, छे ! हा क्रम चुकला. (पुन्हां नीट बोलत) युधिष्ठिरादि गुरुजनांचें आपल्याला वंदन. त्यांच्यामागून मी घटोत्कच आपल्याला वंदन करीत आहें.

**धृतराष्ट्र** : ये बाळ, ये ! भावाच्या निधनामुळें तुझें हृदय व्यथित झालें आहे. तुला हें प्रिय नव्हे— मलाहि हें दुःख आहेच ! म्हणजे ही बाब तुलाच लागू पडते असें नाहीं. माझ्या पुत्रांच्या अपराधामुळें मीहि दीन बनलों आहें !

**घटोत्कच** : अहो, तुम्ही किती चांगले आहांत ! मंगलांना जन्म देणाऱ्या आजोबांना भगवान श्रीकृष्णांचा निरोप आहे—

**धृतराष्ट्र** : ( आसनावरून उठत ) काय आज्ञा आहे भगवान श्रीकृष्णांची ?

**घटोत्कच** : ( घाईनें ) अंहं–अंहं ! जनार्दनांचा संदेश आपण बसूनच ऐकावा.

**धृतराष्ट्र** : जशी भगवान श्रीकृष्णांची आज्ञा. ( बसतो. )

**घटोत्कच** : आजोबा, ऐका : " ' बाळ अभिमन्यु ! कुरु-वंशाच्या प्रिय दीपका ! यदुकुलाच्या लाडक्या अंकुरा ! तुझ्या आईला, मामाला आणि मलासुद्धां सोडून आजोबांना भेटण्याच्या आशेनें स्वर्गाला निघून गेलास ना ! '– आजोबा, अर्जुनांची ही दशा झाली– एका पुत्राच्या निधनानें ! मग तुमची काय होईल ? तेव्हां, खंबीर व्हा आणि स्वतःच्या सैन्याला आवरा. म्हणजे पुत्रशोकामुळें उत्पन्न झालेला अग्नि स्वतःच्या प्राणांचाच बळी घेऊन जळणार नाहीं ! "— असा त्यांचा संदेश आहे.

**धृतराष्ट्र** : कृष्णानें रागानें आणि निश्चयानें हे उद्‌गार काढले आहेत. सर्व क्षत्रियांचा वध करण्यासाठीं अर्जुन धनुष्य घेऊन सिद्ध झाल्यासारखा दिसतो आहे मला !

**दुर्योधनादि कौरव** : आम्हांला तर हे उद्‌गार ऐकून हसूं येतें आहे !

**घटोत्कच** : यांत हसण्यासारखें काय आहे ?

**दुर्योधन** : हें हसण्यासारखें आहे : एकट्या पार्थाच्या हातून राजमंडलाचा विनाश होईल असें रागाच्या भरांत कृष्ण समजत असेल तर त्यानें देवाशीं संधान बांधलें आहे असें म्हणावें लागेल !

**घटोत्कच** : तुम्ही हसतां आहां ! मी श्रीकृष्णांचा प्रेषित म्हणून त्यांनीं सांगितलेलें बोललों, आणि पार्थकाकांचा शोक ऐकविला. पण म्हणून तुमचें वागणें बरोबर ठरतें काय ? खरें म्हणजे श्रीकृष्णाचा संदेश तुम्हींहि ऐकला पाहिजे.

**दुःशासन** : ( उसळून ) जीभ आवर ! क्षत्रियांचा अपमान करतोस ? पृथ्वीवरील सर्व राजे ज्याच्या हुकुमाचे ताबेदार आहेत, त्याच्यासमोर संदेश ऐकला गेलाच तर तो राजाचा, दुसरा कोणताहि नव्हे !

**घटोत्कच** : (चिडून) कोण ? दुःशासन बोलतो आहे का ? अरे दुःशासना, श्रीकृष्ण-तुमच्या दृष्टीनें राजे नव्हत काय ? अरे पूर्वीं जरासंधाच्या नगरींत उच्च पदाहून ढासळलेल्या राजांची ज्यांनीं सुटका केली, राजमंडल प्रत्यक्ष हजर असतांना भीष्मांच्या हातून ज्यांनीं अर्घ्यदान घेतलें, ज्यांच्या मंगल वक्षाच्या शय्यागृहांत लक्ष्मी रमलेली असते आणि त्यांचा आदेश पाळायला तत्पर असते, ते राजांचे राजे, सर्वांना वंद्य चक्रपाणि श्रीकृष्ण तुमच्या हिशेबीं राजे नव्हत काय ?

**दुर्योधन** : दुःशासना, हा वादविवाद पाहिजे कशाला ? ( घटोत्कचाकडे वळून ) तो राजा असेल तर भले असो ! बलवान् असेल तर भले असो ! जास्त बोलण्याची इथें काय जरूर आहे ? काय म्हणतो आहे तुमचा प्रभु ?

**घटोत्कच :** ( ओरडून ) हो हो ! भगवान श्रीकृष्ण म्हणजे प्रभूच आहेत, तिन्ही जगांचे स्वामी ! खास करून आमचे प्रभु ! सांगून ठेवतों : क्षत्रियांचा विनाश आतां पूर्ण झालाच म्हणून समजा. शेकडों राजांची प्रेतें पडून पृथ्वीलाहि जरा हलकें वाटूं द्या ! पुत्रनिधनाचें निधनाचें दुःख झालें असलें तरी युद्धाच्या आघाडीवर उगारलेलीं उग्र अस्त्रें सोडायला अर्जुनकाकांना कांहीं मोठा भार होणार नाहीं !

**शकुनि :** ( उपहासानें ) केवळ बोलूनच असेल तर ही पृथ्वी जिंकली हें कबूल ! आणि एकेका वाक्यानें करायचा असेल तर सर्व क्षत्रियांचा वध झाला हेंहि कबूल ! !

**घटोत्कच :** शकुनिमामा बोलताहेत ना ? ( शकुनीकडे वळून ) मामा, अहो शकुनिमामा ! फांसे द्या फेकून; आणि लढण्याच्या कामीं येईल, ज्यावर बाण फेकतां येतील, असा चांगला सारीपाट तयार करा ! इथें बाई जिंकायची नाहीं, कीं राज्याचा कारभार बळकावायचा नाहीं ! इथें प्राणांचा पण आहे....आणि तीक्ष्ण शक्तीच्या बाणांशीं प्रेमगांठ आहे ! !

**दुर्योधन :** अरे, अरे ! हा वळणावर गेला आपल्या ! ( घटोत्कचाकडे वळून, संतापानें ) तूं टोमणे मारतो आहेस.... मर्यादेचें उल्लंघन करून कठोर बोलतो आहेस ! हात लांब करून बडबडतांना तुला कांहीं वाटत नाहीं ? आईच्या वळणावर जाऊन तुला एवढा उद्दाम गर्व झाला असेल तर लक्षांत ठेव : आम्हीहि भयंकर आहोंत आणि राक्षसांप्रमाणें आमचाहि स्वभाव उग्र आहे !

**घटोत्कच :** (उपरोधानें) छे, छे भलतेंच ! (ठासून बोलत) राक्षसांपेक्षांहि तुम्ही अधिक क्रूर आहांत ! बघा ना—लाखेच्या घरांत झोपलेल्या आपल्या भावांना राक्षस जाळीत नाहींत ! राक्षस आपल्या भावाच्या पत्नीला केस धरून ओढीत नाहीत ! युद्धामध्यें पुत्राचा वध करावा असें राक्षसांच्या कल्पनेंतहि येत नाहीं ! राक्षसांचीं शरीरें विकृत असतील, त्यांचा व्यवहार उग्र असेल, पण ते घृणेला पारखे झालेले नसतात....!

**दुर्योधन :** (चिडून) तूं दूत म्हणून आला आहेस—युद्ध करण्यासाठीं कांहीं आलेला नाहींस. संदेश घेऊन मुकाट्यानें जा. आम्ही दूताचा घात करीत नसतों !

**घटोत्कच :** (उसळून) काय ? दूत म्हणून मला खिजवतां ? बस करा ! मी नाहीं दूत ! (एकदम) बंद करा हा उद्योग ! सगळे मिळून या लढायला ! तुमच्यासमोर मी जो हा उभा राहिलों आहे तो धनुष्याची दोरी तुटल्यामुळें दुर्बळ झालेला अभिमन्यु नव्हे !....लहानपणापासून माझी ही महत्त्वाकांक्षा होती. याद राखा—ओठ चावीत, मुठी वळीत हा घटोत्कच इथें उभा आहे ! ज्या पुरुषाची यमाच्या घरीं जायची इच्छा असेल त्यानें उठावें !

[ दुर्योधन वगैरे चिडून उठतात व धावून जातात. धृतराष्ट्र मध्यें पडतो. ]

**धृतराष्ट्र :** बाळ घटोत्कचा, शांत हो ! माझ्या शब्दासाठीं बोललेलें मानून घे !

**घटोत्कच :** बरें आहे, बरें आहे ! आजोबांच्या शब्दासाठीं मी स्वतःला दूत म्हणवून घेतों.तरीहि मला माझा संताप आवरणें कठीण आहे. ( दुर्योधनास ) काय विनंति आहे तुमची ?

**दुर्योधन** : ( त्वेषानें ) अरे जा ! म्हणे विनंति ! माझे हे शब्द त्याला जाऊन सांग : ‘ फुकटची बडबड कशाला करतोस ? तुझ्या कठोर बोलण्यानें आमच्यावर कांहीं परिणाम व्हायचा नाहीं. चिडल्यावर तुझ्याशीं बोलण्याचा प्रश्नच नाहीं– जेव्हां युद्ध जुंपेल तेव्हां बोलूं ! शेंकडों राजांनीं दाटीदाटीनें माझ्यावर छत्रें धरलीं आहेत अशा स्थितींत मी बाहेर पडायच्या तयारींतच आहें. तूं पांडवांच्या बरोबर राहा.... तुला जो जबाब द्यायचा तो मी बाणांनीं देईन ! ’

**घटोत्कच** : ( रागांत ) आजोबा, निघालों मी.

**धृतराष्ट्र** : ( खेदपूर्वक ) जा बाळ, जा.

[ आकाशमार्गानें घटोत्कच जाऊं लागतो. खालीं पाहात कौरवपक्षीय राजांना उद्देशून शेवटचे शब्द बोलतो. ]

**घटोत्कच** : अहो राजेहो ! जनार्दनांच्या संदेशांतले हे शेवटचे शब्द आहेत, ऐका : ‘ धर्माप्रमाणें वाग, आपल्या बांधवांची काळजी कर. मनांत आहे तें सर्व इथें आचरणांत आण. क्षत्रियजातीच्या रूपानं जणुं उपदेश करावा म्हणून पांडवांचें रूप घेऊन सूर्याच्या किरणांबरोबर प्रत्यक्ष कृतान्त तुमच्याकडे येत आहे ! ’

[ घटोत्कच दिसेनासा होतो. दुर्योधन वगैरे पाहात राहातात. धृतराष्ट्र कपाळाला हात लावतो. ]

* * *

## ४



# ऊरुभंग

## पात्रें

( प्रवेशाच्या अनुक्रमानें )

तीन सैनिक
बलदेव
दुर्योधन
धृतराष्ट्र
गांधारी
मालवी, पौरवी ( दुर्योधनाच्या राण्या )
दुर्जय ( दुर्योधनाचा पुत्र )
अश्वत्थामा

[ रणभूमि. प्रचंड ध्वनि. पाठोपाठ तीन सैनिक प्रवेश करतात. ]

**तीन सैनिक :** बापरे ! हा आवाज कसचा ? मेघांचा गडगडाट ? का वज्रपातानें पर्वतांचा चुराडा होत आहे ? का प्रलयकालच्या भीषण नादांचे प्रचंड प्रतिध्वनि उमटून त्यांनीं ही पृथ्वी विदीर्ण होत आहे ? झंझावाताच्या सपक्यानें उसळलेल्या क्षुब्ध लाटा मन्दरपर्वताच्या दऱ्यामध्यें आणि गुहामध्यें प्रचंड वेगानें घुसताहेत आणि त्यामुळें खवळलेला सागर गर्जना करीत आहे का ? चला, पाहूं या.

[ सर्वजण पुढें सरतात. ]

**पहिला सैनिक :** अरे, द्रौपदीच्या केशाकर्षणानें खवळलेल्या भीमसेनाचें आणि आपल्या शतबंधूंच्या मरणानें चवताळलेल्या महाराज दुर्योधनाचें गदायुद्ध सुरू झालें आहे ! व्यास बलराम, कृष्ण, विदुर—प्रभृति कुरुकुलाचीं दैवतेंहि जातीनें हजर आहेत !

**दुसरा सैनिक :** ( तन्मयतेनें निहाळीत ) पाहा—एकानें गदेचा भीषण प्रहार केला तर दुसरा ती चुकवून मोठ्यानें गर्जना करतो. एक चट्दिशीं हात मागें खेचतो तर दुसरा प्रतिपक्षाच्या वाराचा निकाल लावतो. मागेंपुढें पवित्रे टाकीत दोघेहि गोल गोल फिरून एकमेकांवर सारखे प्रहार करीत आहेत. गड्यांनो, दुर्योधनमहाराजांचें युद्धकौशल्य निर्विवाद आहे. परंतु भीमाची शक्ति जबरदस्त आहे.

**तिसरा सैनिक :** युद्धांमध्यें अद्वितीय आणि पर्वतप्राय अशा ह्या भीमसेनाच्या मस्तकावर गदेचा गाढ प्रहार झाला. त्यांतून वाहणाऱ्या रक्तानें त्याची गात्रें भरून गेलीं.

अशनिपातानें जळालेल्या हेमकूट पर्वतांतून विरघळलेल्या धातूंचे पाट वहावेत आणि तो खालीं बसावा तसा हा भीम जमिनीवर कोसळला आहे.

**पहिला सैनिक :** गाढ प्रहारानें निपचित पडलेल्या भीमाला पाहून व्यास हनुवटीला बोट लावून स्तिमित दृष्टीनें उभे आहेत—

**दुसरा सैनिक :** युधिष्ठिराचा चेहरा काळवंडला आहे, विदुराच्या डोळ्यांत अश्रु जमा झाले आहेत—

**तिसरा सैनिक :** अर्जुनानें गांडीव धनुष्याला हात घातला आहे, कृष्णांनी आकाशाकडे नजर लावली आहे—

**सर्वजण :** गदायुद्ध पाहायला उभे राहिलेले बलराम आपल्या शिष्यावर खूष होऊन आपला नांगर हवेंतल्या हवेंत फिरवीत आहेत !

**पहिला सैनिक :** आपले दुर्योधनमहाराज म्हणजे वीर्याचें आगर ! विविधरत्नें जडवलेल्या किरीटानें त्यांचें मस्तक पाहा कसें शोभतें आहे ! अभिमान, विनय, रुबाब, साहस—सारे गुण त्यांच्या ठायीं एकवटले आहेत. भीमाचा उपहास करीत ते म्हणताहेत—' भीमा, दीन झालेल्या प्रतिपक्षावर वीरपुरुष युद्धामध्यें वार करीत नसतात. घाबरूं नकोस ! '

**दुसरा सैनिक :** पाहिलेंत ? भीमाचा चाललेला हा उपहास पाहून जनार्दन कृष्ण स्वतःच्या मांडीवर चापटी मारून भीमाला कांहीं खूण करीत आहेत.

**पहिला सैनिक :** अरे, पुन्हां गदायुद्ध जुंपलें ! भीमानें तळहात जमिनीवर घासले, आवेगानें अस्तन्या सावरल्या,

ओठ चावले, पराक्रमाच्या ईर्ष्येनें चवताळून मोठी गर्जना केली. आणि....अरेरे! धर्माची लाज सांडून, युद्धनियमाला धाब्यावर बसवून या भीमानें कृष्णांनीं केलेल्या खुणेप्रमाणें दुर्योधनाच्या दोन्हो मांड्यांवर गदा घातली.

**सर्वजण** : अरेरे! महाराज खालीं कोसळले!

**तिसरा सैनिक** : दुर्योधनाविषयीच्या आपुलकीनें हलधर बलरामांचा राग उफाळून आला आहे! आणि हें पाहून व्यासांनीं सूचना केली त्याप्रमाणें पांडवांनीं भीमाच्या भोंवतीं आपल्या हाताचा पिंजरा उभा केला आहे; आणि कृष्णांच्या बाहूवर रेललेल्या भीमाला ते रणभूमीवरून घेऊन चालले आहेत.

**पहिला सैनिक** : भीमाला असें गुपचुप घेऊन जात असलेले पाहून हलायुध बलरामांचे नेत्र क्रोधानें अधिकच विस्फारले आहेत! अरे, ते इकडेच येत आहेत. येथें उभे राहण्यापेक्षां महाराजांच्या जवळ तरी जाऊं या.

**सर्वजण** : चला.

[ बलदेव प्रवेश करतो. ]

**बलदेव** : राजेहो, हें बरें नव्हे! शत्रुसैन्याचा काळ अशा माझ्या नांगराची मर्यादा त्यानें पाळली नाहीं. द्वंद्वयुद्धाचे नियम त्यानें झुगारून दिले. आपल्या उन्मत्तपणानें त्यानें माझीहि कदर केली नाहीं. युद्धाच्या ऐन मोक्यावर त्यानें दुर्योधनाच्या मांड्यांवर आपली ती गदा घालून त्याला खालीं पाडलें आणि त्याचबरोबर कुल, नियम आणि समृद्धि यांना पण मातींत मिळवलें! दुर्योधना, एक क्षणभर स्वतःला सावरून धर. ह्या माझ्या नांगराचें अग्र, स्वर्गीय सौभनगराच्या विध्वंसांत माखलें

आहे, महासुराच्या नगरीची उंच तटबंदी ह्यानें अंकुशाप्रमाणें उचलली आहे. यमुनेच्या प्रवाहाला त्यानें आपल्यामागें खेंचून आणलें आहे. शत्रुसैन्याच्या प्राणांच्या नजराण्यानें ह्याची पूजा झाली आहे. हा माझा नांगर हातांत सावरून शेत नांगरतांना फिरवावा तसा भीमाच्या विपुल वक्षःस्थलावर मी आज सैरा-वैरा ओढतों आणि रक्ताच्या आणि घामाच्या ओल्या चिखलांत त्याला बुडवून काढतों !

[ पडद्याआड ]

भगवन् हलायुध ! शांत व्हा, शांत व्हा !

**बलदेव** : अरे, या अवस्थेंत देखील हा बिचारा दुर्योधन मला अनुसरतो आहे ! राज्यश्री भोगणारा हा दुर्योधन— आज ओल्या रक्तानें त्याची कांति माखली आहे. हीच समरावरली चंदनी उटी ! जमिनीवर सरपटण्यानें त्याचे बाहु धुळीनें भरून लाल झाले आहेत–रांगणाऱ्या बाळाची अवस्था त्याच्यावर लादली गेली आहे ! अमृतमंथनाचें काम संपल्यावर सुरांनीं आणि असुरांनीं मंदरपर्वतापासून सोडलेला वासुकी साप आपली कात खेचीत क्षीरसागराच्या जलांतून जसा थकलेला एकाकी सरपटत गेला असेल, तसा हा माझ्यामागें येत आहे !

[ ज्याच्या दोन्ही मांड्या भग्न झाल्या आहेत,
असा दुर्योधन खुरडत येतो. ]

**दुर्योधन** : ( स्वतःशीं ) बांधलेले संकेत भीमानें मोडले.... गदाप्रहाराच्या जखमेनें माझ्या मांड्या जर्जर झाल्या आहेत.... दोन्ही हातांच्या टेक्यानें माझ्या ह्या अर्धमृत देहाला ढकलीत मी

लोटतों आहे ! ( बलरामाजवळ सरकत, उघड ) शांत व्हा, शांत व्हा, भगवन् हलायुध ! जमीनदोस्त झाल्यावरहि माझें हें मस्तक कोणाच्या पायावर आधीं लवलें असेल तर तें आपल्या ! म्हणून म्हणतों, राग सोडा ! कुरुकुलाचा अंत करणारे ते पांडव—जगूं देत खुशाल ! वैर, युद्धाच्या गोष्टी आणि आम्ही....सर्वच विनाशाला गेलें आहे !

**बलदेव** : नाही दुर्योधना ! एक क्षणभरच स्वतःला सांवरून धर.

**दुर्योधन** : आपण काय करणार आहांत ?

**बलदेव** : अरे, ऐक ! नांगर उचलून त्याच्या टोकानें त्यांचीं शरीरें नांगरून, मुसळाच्या प्रहारांनीं त्यांच्या खांद्यांचे आणि हृदयांचे तुकडे तुकडे करून ह्या पांडूच्या पोरट्यांना, रथ, घोडे, हत्ती यांच्यासकट, युद्धांत कामीं आलेल्या तुझ्या सैनिकां-बरोबर स्वर्गाच्या यात्रेंत सोबत म्हणून मी पाठवणार आहें !

**दुर्योधन** : नका, नका, असें कांहीं करूं नका ! भीमानें आपली प्रतिज्ञा पूर्ण केली आहे....माझे शंभर भाऊ स्वर्गाला गेले आहेत....आणि माझी ही अशी अवस्था झाली आहे ! अशा वेळीं युद्धानें काय साधणार आहे, बलराम ?

**बलदेव** : माझ्या डोळ्यांदेखत तुझी वंचना झाली म्हणून मी संतापलों आहें.

**दुर्योधन** : आपल्याला खरेंच का वाटतें कीं माझी वंचना झाली ?

**बलदेव** : यांत संशय आहे ?

**दुर्योधन :** छे, छे.! उलट आज मीं माझ्या प्राणांचें खरें मोल दिलें आहे! अग्नीनें पेटलेल्या भयंकर लाक्षागृहांतून ज्यानें युक्तीनें वाट काढली, कुबेराच्या नगरींत युद्धामध्यें ज्यानें पर्वताच्या फेकलेल्या शिला फोडून काढल्या आणि राक्षसपति हिडिंबाचा प्राण ज्यानें हिरावून घेतला, त्या भीमानें कपट करून आज मला जिंकलें असें आपल्याला वाटत असेल तर बलराम, असा मी जिंकलों गेलेलों नाहीं!

**बलदेव :** युद्धांमध्यें कपट केल्यावर भीमसेनाला जिवंत राहूं द्यायचें?

**दुर्योधन :** काय, भीमसेनानें माझ्याशीं कपट केलें?

**बलदेव :** मग कोणीं तुझी ही दशा केली?

**दुर्योधन :** ऐकावं!....इंद्राचा पारिजातक वृक्ष आणि त्याचा अभिमान ज्यानें एकदमच हिरावून आणले, हजारों दिव्य वर्षेंपर्यंत सागरजलावर ज्यानें लीलेनें निद्रा घेतली, त्या जगत्प्रिय हरीनें, केवळ युद्धाच्या प्रेमानें, भीमाच्या तीव्र गदेंत प्रवेश केला....आणि त्या हरीनें मला मृत्यूच्या भेटीला पाठविलें!

[ पडद्याआड ]

दूर व्हा, दूर व्हा, लोकहो! वाट करा!

**बलदेव :** ( पाहून ) अरे, महाराज धृतराष्ट्र....गांधारी.... अंतःपुरांतील गोत....! शोकानें भरलेल्या हृदयांनीं, बिचकत बिचकत, दुर्जयाच्या पावलांवर पाऊल टाकीत, हे सारे इकडेच येत आहेत! ( अर्धवट स्वतःशीं ) सुवर्णाच्या यज्ञस्तंभाप्रमाणें लांब बाहू असलेला हा गर्वशाली धृतराष्ट्र म्हणजे शौर्याची खाण! मात्र याची दृष्टि आपल्या शंभर पुत्रांमध्यें विभागून गेली

आहे. स्वर्गाचा बचाव कसा होईल, या काळजीनें देवांनीं दुष्ट अंधकाराच्या मुठी याच्या डोळ्यांवर मारल्या आणि मगच ह्याला जन्माला घातलें असलें पाहिजे, यांत शंका नाहीं!

[ धृतराष्ट्र, गांधारी, दुर्योधनाच्या दोन राण्या आणि छोटा दुर्जय प्रवेश करतात. ]

**धृतराष्ट्र** : मुला, कुठें आहेस तूं?

**गांधारी** : बाळ, कुठें आहेस?

**दोन्ही राण्या** : महाराज, कुठें आहांत?

**धृतराष्ट्र** : ( स्वतःशीं ) अरेरे! किती वाईट! युद्धामध्यें कपट करून माझ्या पुत्राला मारल्याचें आज ऐकलें आणि आंतल्या आंत अश्रूंची धार लागली. त्यामुळें माझें हें मुख अधिकच आंधळें झालें आहे! ( उघड ) गांधारी! जिवंत आहेस ना?

**गांधारी** : जिवंत आहें....करंटें नशीब माझें!

**दोन्ही राण्या** : महाराज! महाराज!!

**दुर्योधन** : ( हेलावून, स्वतःशीं ) माझ्याहि स्त्रिया रडूं लागल्या! अरेरे, केवढी दुःखाची गोष्ट! त्या वेळीं गदेच्या प्रहाराची मला संवेदनाहि जाणवली नाहीं....परंतु आतां माझ्या अंतःपुरांतल्या स्त्रिया उघड्या माथ्यांनीं रणभूमीवर आलेल्या पाहून मात्र ती वेदना उफाळून आली आहे!

**धृतराष्ट्र** : गांधारी, दिसतो आहे का कुठें तो? स्वकुलाचा मोठा अभिमान आहे त्याला....दुर्योधन त्याचं नांव—

**गांधारी** : नाहीं दिसत महाराज!

**धृतराष्ट्र :** काय, नाहीं दिसत ? अहो, आज मी खरा आंधळा झालों ! कारण या आणीबाणीच्या वेळीं मी माझ्या पुत्राला पाहूं शकत नाहीं ! दुष्टा यमा ! शत्रूंच्या चढाईला चिरडून टाकणारे, गर्वानें आणि शौर्यानें झळाळणारे, अत्यंत धैर्यशाली असे शंभर वीर पुत्र जन्माला घातल्याचा ज्यानें अभिमान बाळगला तो हा धृतराष्ट्र, पुत्राच्या हातची जमिनीवर सांडलेली तिलांजलि स्वीकारायला एकदां सुद्धां पात्र असूं नये ?

**गांधारी :** बाळा सुयोधना ! माझ्याशीं बोल ना ! शंभर पुत्रांच्या विनाशानें महाराज ढासळले आहेत. त्यांना धीर तरी दे.

**बलदेव :** अरे, ही महिषी गांधारी ! पुत्रपौत्रांचें मुख पाहण्याचें कुतूहलहि जिनें आपल्या नेत्रांना उरूं दिलें नाहीं त्या गांधारीचें सारें धैर्य दुर्योधनाचा अस्त होतांच आज शोकानें गिळून टाकलें आहे ! पतिभक्तीचें चिह्न म्हणून हिनें डोळ्यांवर बांधलेली ही पट्टी आज अनिवार अश्रूंनीं भिजून गेली आहे.

**धृतराष्ट्र :** पुत्रा दुर्योधना ! अठरा अक्षौहिणींच्या सम्राटा ! कुठें आहेस तूं ?

**दुर्योधन :** ( स्वतःशीं ) वा रे सम्राट !

**धृतराष्ट्र :** माझ्या शंभर मुलांतील ज्येष्ठ मुला ! माझ्याशीं बोल.

**दुर्योधन :** ( उघड ) बोलतों आहें ना ! ज्या घटना घडल्या त्यांनीं मी शरमिंदा झालों आहें.

**धृतराष्ट्र :** ये मुला ! मला वंदन कर.

**दुर्योधन** : हा आलों पाहा. ( उठण्याचा प्रयत्न करतो, पण खालीं पडतो. स्वतःशीं ) अरेरे ! हा दुसरा प्रहार !! दुर्दैवा ! केस ओढून गदा भिरकावून भीमानें माझ्या मांड्याच नष्ट करून टाकल्या असें नाहीं....गुरुजनांना पादवंदन करण्याची शक्यताहि नाहींशी करून टाकली आहे !

**गांधारी** : मुली, इकडे ये.

**दोन्ही राण्या** : आम्ही जवळच आहोंत.

**गांधारी** : तुमच्या पतीला शोधा.

**दोन्ही राण्या** : जातों...नशीब आमचें !

**धृतराष्ट्र** : अरे, हा कोण माझ्या वस्त्राचा सोगा खेंचून मला पुढें घेऊन जातोय् ?

**दुर्जय** : आजोबा, मी दुर्जय.

**धृतराष्ट्र** : बाळ दुर्जय, तुझ्या वाडिलांना शोधून काढ.

**दुर्जय** : मी दमलों आहे, आजोबा !

**धृतराष्ट्र** : जा, आपल्या वडिलांच्या मांडीवर विसावा घे.

**दुर्जय** : बरें आजोबा ! ( दुर्योधन आहे तिकडे जात ) बाबा कुठें आहांत तुम्ही ?

**दुर्योधन** : ( स्वतःशीं, खेदानें ) हा पण आला का ! अरे, जीवनाच्या कुठल्याहि अवस्थेंत हृदयांत घर करून राहणारें हें पुत्रप्रेम आज मला भाजून काढीत आहे ! कारण, त्याला दुःखाची तोंडओळख देखील नाहीं. माझ्या मांडीवर लोळण्याचें याचें वय आहे. या पराभूत स्थितींत मला पाहून हा दुर्जय काय म्हणेल बरें ?

**दुर्जय :** ( दुर्योधनाजवळ जाऊन, मोठ्यानें ) हें पाहा बाबा— जमिनीवर बसले आहेत !

**दुर्योधन :** बाळ, कशाला आलास तूं ?

**दुर्जय :** तुम्हांला खूप उशीर झाला म्हणून.

**दुर्योधन :** ( स्वतःशीं ) अरे, या अवस्थेंत देखील पुत्रप्रेमानें माझ्या हृदयाला चटके बसताहेत !

**दुर्जय :** मला तुमच्या मांडीवर बसायचें आहे. ( त्याच्या मांडीवर चढतो. )

**दुर्योधन :** ( दुर्जयाला अडवीत, कळवळून ) दुर्जय ! दुर्जय ! ! अरेरे, अरेरे ! ! माझ्या हृदयांत प्रीतीला जन्म देणारा, माझ्या नेत्रांचा उत्सव असा जो चंद्र, तोच आज काळ फिरल्यावर अग्नि बनला आहे !

**दुर्जय :** मी मांडीवर बसतोंय् तर कां बसूं देत नाहीं ?

**दुर्योधन :** बाळ, सोड तुझी नेहमींची बसायची जागा.... ....बैस कुठेंतरी, जा. ज्यावर तूं पूर्वी अनेक वेळां बसला असशील तें तुझें आसन आजपासून खलास झालें आहे !

**दुर्जय :** बाबा, कुठें जाणार आहांत तुम्ही ?

**दुर्योधन :** माझे शंभर भाऊ आहेत ना, त्यांच्यामागें.

**दुर्जय :** मग मलाहि तिथें न्या.

**दुर्योधन :** जा बाळ, हे शब्द भीमाला सांग.

**दुर्जय :** ( मान हलवीत ) इकडे या, बाबा ! तुम्हांला शोधताहेत—

**दुर्योधन :** कोण बरें, बाळ ?

**दुर्जय** : आजी, आजोबा, .... घरांतील सर्व माणसें.

**दुर्योधन** : जा बाळ ! मला येण्याची शक्ति उरली नाहीं.

**दुर्जय** : मी घेऊन जाईन तुम्हांला.

**दुर्योधन** : लहान आहेस तूं अजून, बाळ !

**दुर्जय** : ( जवळ जात ) आई, आजी ! हे पाहा बाबा !

**दोन्ही राण्या** : हाय ! हाय ! महाराज ! !

**गांधारी** : कुठें आहे माझा लाडका ?

**दुर्जय** : हे पाहा बाबा जमिनीवर बसले आहेत.

**धृतराष्ट्र** : काय हो, हा सम्राट का ? सोन्याच्या खांबाप्रमाणें जो भरभक्कम असून या जगांत सर्व पृथ्वीपतींचा एकमेव स्वामी आहे, त्या माझ्या सम्राटाला महाद्वाराच्या तुटलेल्या अडसराप्रमाणें करून जमिनीवर लोळवलें आहे काय ?

**गांधारी** : बाळ सुयोधन, थकला असशील !

**दुर्योधन** : ( गहिंवरून ) तुझ्यासारख्या मातेचा पुत्र म्हणवून घेतांना मला अभिमान वाटतो !

**धृतराष्ट्र** : कोण बोलत आहे ही ?

**गांधारी** : महाराज, मी—निर्भय पुत्रांची माता.

**दुर्योधन** : आज माझा खरा जन्म झाला असें मी मानतों ! बाबा, आतां दुःख करून काय उपयोग ?

**धृतराष्ट्र** : मुला, कसें दुःखाला दूर लोटूं मी ? शौर्यानें आणि बलानें उद्दाम रणयज्ञाची दीक्षा घेतलेले तुझे शंभर भाऊ यापूर्वींच नष्ट झाले असले तरी तुझ्या एकट्याच्या हत्येनें आज ते खरेखुरे मेले आहेत !

[ मूर्च्छित पडतो. ]

**दुर्योधन :** अरेरे ! ह्यांना मूर्च्छा आली ! बाबा, आईला धीर द्यायला हवा ना !

**धृतराष्ट्र :** ( शुद्धीवर येऊन ) मुला, काय बोलून धीर देऊं ?

**दुर्योधन :** ‘ युद्धांत आपल्या पुत्रानें पाठ न दाखवितां मरण स्वीकारलें ’ हें सांगून ! बाबा, माझ्यावर अनुग्रह करा. शोक आवरा. माझें मस्तक केवळ तुमच्याच पायांशीं लवलें आहे. ज्या अभिमानानें मी जन्म घेतला त्याच अभिमानानें जळत्या अग्नीची पर्वा न करतां मी स्वर्गाला जाईन.

**धृतराष्ट्र :** मी म्हातारा झालों आहें. जगण्याची मला इच्छा राहिलेली नाहीं. निसर्गानेंच माझे डोळे मिटून टाकले आहेत. परंतु धैर्याला आंत दडपून उसळलेला हा तीव्र पुत्र-शोक मला व्याकुळ करीत आहे.

**बलदेव :** ( स्वतःशीं ) अरेरे, काय करूं ! दुर्योधनाची आशा ज्यांनीं सोडून दिली आहे, ज्यांचे डोळे कायमचे मिट-लेले आहेत, त्या धृतराष्ट्रमहाराजांसमोर जाऊन बोलायला मला शक्तिच उरली नाहीं !

**दुर्योधन :** आई, तुला एक विनंती करावयाची आहे.

**गांधारी :** बोल, बाळ !

**दुर्योधन :** तुझ्या चरणांवर मस्तक ठेवून मी म्हणतों कीं, माझ्या हातून जर कांहीं पुण्य घडलें असेल तर येत्या जन्मीं पण तूंच माझी आई हो !

**गांधारी :** तूं माझ्या मनची गोष्टच बोलून दाखविली आहेस !

**दुर्योधन** : (पत्नीकडे वळून) मालवी, तूं पण ऐक. द्वंद्व-युद्धाच्या वेळीं झालेल्या गदेच्या आघातांनीं माझी भुंवई दुभंगून गेली, प्रहारांनीं उसळलेल्या रक्तधारांनीं माझ्या छाती-वरील हाराची जागा वाहून नेली. हे माझे बाहू—जखमांचीं सुवर्ण-बाहुभूषणें लेवून किती शोभताहेत बघ ! तुझा पति सामोरासमोरां युद्धांत पडला आहे. क्षत्रियकन्ये, तुला रडायला काय झालें ?

**मालवी** : मी अज्ञ आहें....आपली सहधर्मचारिणी आहें.... म्हणून मला रडूं येतंय्.

**दुर्योधन** : (दुसऱ्या पत्नीस) पौरवी, तूं सुद्धां ऐक : वेदामध्यें सांगितलेल्या अनेक अभिमत यज्ञांचें आह्मी यजन केलें, बांधवांना आधार दिला. आमचे प्रिय शंभर भाऊ शत्रूंच्या मस्तकावर पाय देऊन उभे राहिले. अठरा सैन्यांच्या अधिपतींना आम्हीं कोंडून चरफडायला लावलें. हा माझा स्वाभिमान बघ. तूंहि मानिनी आहेस. अशा स्वाभिमानी पुरुषांच्या स्त्रिया मुळूमुळू रडत नसतात !

**पौरवी** : मी नाहीं रडत. आपल्याबरोबर चितेंत प्रवेश करण्याचा माझा निर्धार झाला आहे.

**दुर्योधन** : दुर्जया, तूंहि ऐक—

**धृतराष्ट्र** : (बाजूला) गांधारी, हा काय बरें सांगणार असेल ?

**गांधारी** : (उत्तर देत) मी त्याचाच विचार करतें आहें.

**दुर्योधन** : (दुर्जयास) माझी केलीस तशी तूं पांडवांची सेवा करायला पाहिजे. आजीची आणि कुंतीमातेची आज्ञा

पाळली पाहिजे. अभिमन्यूची आई आणि द्रौपदी यांचा स्वमातेप्रमाणें आदर केला पाहिजे. बघ मुला–' जगानें ज्याची कीर्ति गावी, ज्याचें हृदय स्वाभिमानानें उजळून निघालें होतें, असा दुर्योधन आपला पिता होता आणि तो रणांगणावर सामोरें लढतांना त्याच्या बरोबरीच्या योद्ध्याकडून मारला गेला–' हें ध्यानांत ठेवून तूं शोक करतां कामा नये. आणि....रेशमी उत्तरीयानें लपेटलेल्या युधिष्ठिराच्या मोठ्या हाताला हात लावून, माझ्या नांवाचा उच्चार होईल तेव्हां, पांडवांच्या बरोबर तूं मला तिलांजली द्यावीस.

**बलदेव :** (खेदानें) अरेरे ! वैराची परिणति पश्चात्तापांत झाली !

[पडद्याआड धनुष्यटंकार]

(ऐकून) हा कसचा आवाज ? रणदुंदुभींचा नाद थांबून केव्हांची शांतता झाली आहे....बाण-कवच-छत्र-चामर अस्ता-व्यस्त पडलेले आहेत....सूत आणि योद्धे मरून पडले आहेत.... अशा वेळीं कोणाच्या धनुष्याचा हा टणत्कार आकाशांत घोंघावणाऱ्या कावळ्यांना सैरावैरा पळवून लावीत आहे ?

[पडद्याआड]

दुर्योधनानें धनुष्याची दोरी खेचली आणि युद्धरूपी यज्ञांत पाऊल टाकलें तेव्हां मीहि त्याच्याबरोबर होतों. पण आतां.... अश्वमेध समाप्त झाल्यावर शून्य यज्ञमंडपांत अध्वर्यूनें प्रवेश करावा, तसा या रणांत मी पुन्हां पाऊल टाकीत आहें.

**बलदेव :** अरे, हा द्रोणगुरूंचा पुत्र अश्वत्थामा इकडे येत आहे. (पाहून) फुललेल्या कमळाच्या पाकळ्यांप्रमाणें ह्याचें

डोळे स्वच्छ आणि मोठे आहेत. सोन्याच्या खांबासारखे ह्याचे सुंदर लांब बाहू लोंबत आहेत. उत्साहभरानें आपलें उग्र धनुष्य खेंचीत हा येत असतांना वाटतें कीं, माथ्यावर इंद्र-धनुष्य लटकलेला जळता मेरूच इकडे येत आहे !

[ अश्वत्थामा प्रवेश करतो. ]

**अश्वत्थामा :** ( पडद्याआड बोललेलीं वाक्यें पुन्हां उच्चारून ) अहो ! युद्धाच्या धुमश्चक्रींत उभय सैन्यांचे समुद्र एकमेकांत मिसळले, त्यावेळीं उसळून वर आलेल्या शस्त्रांच्या मगरींनीं ज्यांच्या देहाचे लचके तोडले आहेत, ज्यांचे श्वास आणि प्राण दोन्ही मंदावले आहेत, त्या युद्धगर्विष्ठ राजांनो, ऐका हो ऐका ! कपटाचें बळ वापरून ज्याच्या मांड्या चिरडल्या तो मी कौरवेंद्र नव्हें ! ज्याचीं शस्त्रें ढिलीं पडून निष्फळ झालीं तो मी सूतपुत्र कर्णहि नव्हें ! मी द्रोणपुत्र आहें ! आणि इथें या विजयभूमीवरील घडामोडी पाहायला उत्सुकतेनें एकटा शस्त्र सरसावून उभा राहिलों आहें. ( किंचित् थांबून ) विजयासाठीं माझे हात फुरफुरत असले तरी आतां कुठलाच लाभ मिळावण्याची आशा उरली नाहीं....युद्धांत जयश्री जिंकूनहि काय उपयोग ? ( विमनस्क फिरतो. एकदम थांबून ) पण छे ! पित्याला तिलांजलि देण्यांत मी व्यग्र असतांना, कुरुवंशाचा तिलक अशा या कुरु-राजाला कपटानें फसवण्यांत आलें, असें मीं ऐकलें. ( खेदानें ) कोणाचा विश्वास तरी बसेल का याच्यावर ? रथांवर, हत्तींवर आरूढ झालेले अकरा अक्षौहिणी सेनेचे धनुर्धारी राजे हातांची ओंजळ करून ज्याच्या तोंडचे शब्द ऐकायला तिष्ठत राहिले, भीष्म आणि परशुरामांच्या बाणाचें कवच वेढलेला माझा पिता हे ज्याचे रणांतील योद्धे, तो अतिरथी दुर्योधनहि जर जिंकला

गेला, तर काळानेंच त्याला जिंकलें हें उघड आहे! (किंचित् थांबून) कुठें बरें असेल तो गांधारीपुत्र ? (कांहीं पावलें चालून, पाहून) अरे, रणसागर पार करणारा हा कुरुराज मेलेल्या हत्ती-घोडे-सैनिकांच्या आणि मोडलेल्या रथांच्या ढिगाऱ्यामध्यें वेढला आहे !....मस्तक लवल्यामुळें किरणाप्रमाणें भासणारे ह्याचे भुरभुरणारे केस....गदाघातानें झालेल्या जखमांतून स्रवणाऱ्या रक्तानें माखलेलीं ह्याचीं गात्रें....यामुळें अस्तगिरीच्या मस्तकावरील शिलातलावर टेकलेल्या, संध्यारागांत बुडलेल्या, मावळतीकडे झुकलेल्या सूर्यासारखा हा दिसत आहे ! (जवळ जाऊन) कुरुराज ! हें काय ?

**दुर्योधन :** (त्याच्याकडे पाहात) गुरुपुत्र ! हें माझ्या असंतोषाचें फळ !

**अश्वत्थामा :** कुरुराज ! यशाचें मूळच आणून तुम्हांला सादर करण्याचा विचार आहे माझा.

**दुर्योधन :** काय करणार आहांत तुम्ही ?

**अश्वत्थामा :** ऐका ! गरुडाच्या पाठीवर बसून कृष्ण युद्धाच्या तयारीला लागला आहे. त्याचे अनेक बाहू उघड भीतिदायक वाटताहेत. त्यानें शार्ङ्ग आणि चक्र सरसावले आहेत.... त्या कृष्णालाच, कांहींतरी चिताडलेला चित्रफलक जसा फेकावा, तसा माझ्या शस्त्रांच्या माऱ्यानें पांडुपुत्रांच्या सकट युद्धामध्यें उडवून देतों !

**दुर्योधन :** नको !....असें कांहीं करूं नका. (सावकाशपणें बोलत) मूर्धाभिषिक्त राजांचा समूळ वंश पृथ्वीमातेच्या अंकावर आडवा झाला आहे. कर्ण स्वर्गाला गेला आहे. शंतनुसुत

भीष्मांनीं आपला देह ठेवला आहे. युद्धाच्या तोंडीं माझ्या देखत माझे शंभर भाऊ नष्ट झाले. आणि आमची ही दशा ! गुरुपुत्र, टाकून द्या तें धनुष्य !

**अश्वत्थामा :** कुरुराज ! द्वंद्वयुद्धांत गदेचा आघात करतांना आणि केस ओढतांना पांडुपुत्र भीमानें तुमच्या मांड्याच चुरडल्या असें नसून तुमचा ताठर अभिमानहि चुरडलेला दिसतो आहे !

**दुर्योधन :** असें कां म्हणतां ? राजांचा देहच मुळीं अभिमानानें घडलेला आहे ! या अभिमानासाठींच तर मीं युद्ध पुकारलें. गुरुपुत्र, असें पाहा : द्यूतामध्यें हातांनीं कुरळे केस पकडून द्रौपदीला जें खेचून आणलें, पुत्रासारखा अभिमन्यु बालवयी असतांहि युद्धाच्या आघाडीवर जो मारला गेला, द्यूताच्या कपटानें जिंकलेले पांडव रानपशूंच्या संगतींत वनाचा आसरा घेऊन जे राहिले—त्याच्यापुढें युद्धाची दीक्षा घेऊनहि पांडवांनीं माझें केलेलें गर्वहरण म्हणजे कांहींच नाही ! विचार करा—

**अश्वत्थामा :** ( आवेगानें ) नाइलाज आहे ! मी प्रतिज्ञा करून बसलों आहें. तुमची, माझी आणि अखिल वीरपुरुषांची शपथ घेऊन मी सांगतों कीं, रात्रीच्या प्रहरीं युद्धाचा वणवा पेटवून रणांगणावर मी पांडवांना भस्म करून टाकीन !

**बलदेव :** ( अचानक पुढें येऊन ) गुरुपुत्रानें उच्चारलेले हे शब्द खरे होतील !

**अश्वत्थामा :** भगवान् हलायुध इथेंच आहेत वाटतें ?

**धृतराष्ट्र :** ( खेदानें ) अरेरे ! त्यांच्या साक्षीनें हें कपट झालें !

**अश्वत्थामा :** ( एकदम ) दुर्जय, इकडे ये पाहूं. ( त्याच्या खांद्याला स्पर्श करून ) बाहूबळानें जिंकलेलें हें राज्य पित्याच्या पराक्रमी वारशानें तुझ्याकडे आलें आहे. अभिषेक घडो वा न घडो; पण तूं आतां राजा आहेस ! माझे ब्राह्मणाचे शब्द आहेत हे.

**दुर्योधन :** शाबास ! माझ्या अंत:करणाला पटेल असेंच झालें !.... ( विव्हळून ) माझे प्राण मला सोडून जाऊं पाहात आहेत !.... (भ्रान्त मन:स्थितीत कुठें तरी पाहात, सावकाश) शंतनुप्रभृति माझे माननीय पितर आणि पितामह मला दिसत आहेत....कर्णाला पुढें करून माझे शंभर भाऊ उठले आहेत.... ज्याच्या केसांचीं झुलुपें कोंवळीं आहेत असा हा अभिमन्यु इंद्राच्या हाताचा टेका घेत ऐरावताच्या मस्तकावर बसून माझ्याशीं रागारागानें बोलत आहे !.... उर्वशी वगैरे अप्सरा माझ्या निकट आल्या आहेत.... हे महासागर माझ्यासमोर साकार झाले आहेत.... ह्या पाहा गंगा वगैरे महानद्या ....वीरांना घेऊन जाणारे हजार हंस जोडलेलें हें विमान काळानें मला घेऊन जाण्यासाठीं पाठवलें आहे...हा आलोंच मीं !

[ मरून पडतो. ]

[ कोणीतरी दुर्योधनाचें शरीर वस्त्रानें झांकतात. ]

* * *

५



# कर्णभार

## पात्रें

( प्रवेशाच्या अनुक्रमानें )

सैनिक
कर्ण
शल्य
शक्र
देवदूत

[ युद्धभूमि. एक घाबरलेला सैनिक त्वरेनें येतो. ]

**सैनिक :** अहो, अहो ! महाराज अंगेश्वरांना एवढा निरोप सांगाल काय ? त्यांना म्हणावं; युद्धाची वेळ येऊन ठेपली आहे.

[ कांहीं आवाज ]

हो, युद्धाची वेळ येऊन ठेपली आहे. हत्तींवर, घोड्यांवर, रथांत बसून अनेक राजे आले आहेत. समराचा हर्ष त्यांच्या पराक्रमी मुखावर ओसंडत आहे. पांडवांच्या ध्वजासमोर त्यांच्या गर्जनेचा सिंहनाद उसळला आहे. लोकवीर महाराज दुर्योधनांना शत्रूंच्या या गर्जना ऐकवत नाहींत. आतां हा प्राणपणाचा समर आहे हें त्यांनीं ओळखलं आहे. म्हणून ते स्वतःच त्वरेनें युद्ध-भूमीवर निघाले आहेत. त्यांचा निरोप–( कांहीं पावलं टाकून, पाहात ) अरे ! आपल्या शिबिरांतून बाहेर पडून खुद्द अंगराजच शल्यासमवेत इकडे येत आहेत ! अंगावर युद्धाचा सर्व पोषाखहि चढविलेला आहे ! अरे, पण हें काय ? समराच्या उत्सवाचे हे प्रमुख. ह्यांचा पराक्रम या डोळ्यांनीं पाहिलेला. त्यांचं हृदय व्याकुळ झाल्यासारखं कां बरं दिसावं ? असं कधींहि झालं नव्हतं ! ज्वलंत तेजानं तळपणारी, समरांत आणि शौर्यात सर्वांच्या आघाडीवर असणारी ही धीरमूर्ति या वेळीं शोकानं सावकाश पावलं टाकीत येत आहे ! स्वतः देदीप्यमान असणारा सूर्य ऐन उन्हाळ्यांत मेघखंडांनीं कोंडून जावा तसे हे कर्णराज दिसत आहेत ! ते येत आहेतच....तर आपण जावं हें बरं.

[ सैनिक एका बाजूनें निघून जातो. दुसऱ्या बाजूनें कर्ण व शल्य येतात. ]

**कर्ण** : माझ्या बाणांच्या मार्गांत आलेले हे राजे लक्ष्य बनतांच जिवंत सुटण्याची शक्यताच नाहीं. परंतु या युद्धाच्या आघाडीवर मला कौरवांचं प्रिय करावयाचं आहे. तो धनंजय जर माझ्या दृष्टीस पडेल तर— शल्यराज ! जिथं तो अर्जुन असेल तिथं घेऊन चल माझा रथ.

**शल्य** : ठीक आहे. [ रथ हाकारण्याचा अभिनय. ]

**कर्ण** : ( जणुं स्वतःशीं ) अरे, पण हें काय ? या प्रचंड युद्धांत परस्पर शस्त्रप्रहारांनीं योद्धे, घोडे, हत्ती, रथ तुटून छिन्न-विच्छिन्न होत असतांना, चवताळलेल्या यमासारखा भीषण परा-क्रमी मी—त्या माझ्या मनांत ऐन युद्धाच्या वेळीं खिन्नतेचे काळे ढग कां बरं दाटून यावेत ? अरेरे ऽ ! आज राधेय म्हणून जरी मी सगळीकडे ओळखला जात असलों तरी माझा जन्म अगोदर कुंतीपासून झालेला आहे. युधिष्ठिरादि पांडव हे माझे धाकटे भाऊ लागतात !...तो हा सुंदर क्षण शेवटीं आला एकदांचा...माझ्या गुणांचा प्रकर्ष दाखविणारा दिवस येऊन ठेपला....आणि नेमकी याच वेळीं माझीं हीं अस्त्रं, मीं संपादन केलेली विद्या निष्फळ ठरावींत ? पण शिवाय, कुंतीमातेनं मला बंदी केली आहे....( एकदम, मोठ्यानें ) शल्यराज, माझ्या अस्त्रांचा वृत्तान्त ठाऊक आहे तुला ?.... ऐक तर.

**शल्य** : तो वृत्तान्त ऐकण्याचं कुतूहल माझ्या मनांत कधीं-पासूनचं आहे.

[ दोघे रथांतून खालीं उतरतात. ]

**कर्ण** : पूर्वी मी परशुरामांच्याकडे गेलों होतों—

**शल्य** : अस्सं.

**कर्ण** : विद्युल्लतेप्रमाणं पिंगट रंगाचा भव्य जटाकलाप त्यांच्या मस्तकीं होता. उसळणाऱ्या तेजाचीं वलयं फाकणारा परशु त्यांच्या हातीं होता. क्षत्रियांचा कर्दनकाळ, भृगुवंशाची पताका ....अशा त्या मुनिश्रेष्ठापाशीं मी गेलों, त्यांना प्रणाम केला, आणि जवळच मुकाट्यानं उभा राहिलों.

**शल्य** : मग ?

**कर्ण** : परशुरामांनीं मला आशीर्वाद दिला आणि विचारलं 'कोण तूं ? इथं कशासाठीं आला आहेस ?'

**शल्य** : तुम्ही काय उत्तर दिलंत ?

**कर्ण** : मी म्हणालों, 'भगवन् ! सर्व अस्त्रविद्या शिकून घेण्याची मला इच्छा आहे.'

**शल्य** : मग ?

**कर्ण** : तेव्हां भगवान परशुराम मला म्हणाले, 'मी ब्राह्मणांना उपदेश देईन, क्षत्रियांना नाहीं.'

**शल्य** : क्षत्रियांशीं त्यांचं पूर्वींपासूनच वैर आहे. पण पुढं काय झालं ?

**कर्ण** : मीं सांगितलं कीं, 'मीं क्षत्रिय नाहीं.' आणि माझ्या अस्त्रविद्येच्या शिक्षणाला सुरुवात झाली.

**शल्य** : अस्सं.

**कर्ण** : असेच कांहीं दिवस गेले. एकदां फळ, मूळ, समिधा, कुश, फुलें आणण्यासाठीं गुरुजी गेले होते. त्यांच्याबरोबर मीहि होतों.

**शल्य** : बरोबर आहे.

**कर्ण** : वनांत भटकण्याच्या परिश्रमांनीं गुरुजी थकून गेले. माझ्या मांडीवर त्यांना झोप लागली.

**शल्य** : मग काय झालं ?

**कर्ण** : तेव्हां—वज्रमुख नांवाच्या एका कीटकानं माझ्या दोन्ही मांड्या पोखरून काढल्या. दुर्दैव ! परंतु गुरुजींची झोप-

मोड होऊं नये म्हणून ती सारी वेदना मीं धैर्यानं सहन केली.... गुरुजींना जाग आली तेव्हां त्यांचं शरीर रक्तानं माखून निघालं होतं ! एकाएकी त्यांच्या क्रोधाचा अग्नि पेटला....त्यानीं मला ओळखलं आणि शाप दिला कीं, ' ऐन वेळीं तुझीं अस्त्र निष्फळ होतील ! '

**शल्य** : अरेरे ! केवढी दुःखदायक शापवाणी उच्चारली त्यांनीं !

**कर्ण** : अस्त्रं तपासून तर पाहूं या. ( अस्त्रें तपासून पाहून ) या अस्त्रांचं सारं वीर्य नाहींसं झाल्यासारखं दिसतं आहे ! ( सखेद स्मित करून ) अरे, हे माझे घोडे पण पावलापावलाला ठेचाळत आहेत. त्यांचे डोळे दैन्यानं झाकलेले आहेत. त्यांना स्वतःची शक्तिच राहिलेली दिसत नाहीं. ( पुढें नजर टाकून ) आणि सप्तच्छदासारखा तीव्र आणि असह्य मदस्राव करणारे हे माझ्या सैन्याचे हत्तीसुद्धां ' युद्धभूमीवरून मागें फीर ' असाच संदेश जणुं मला देत आहेत. ( क्षणभर स्तंभित होऊन ) हें काय? शंखदुंदुभीहि निःशब्द झाल्या आहेत !

**शल्य** : अरेरे ! दुर्दैव, दुर्दैव !

**कर्ण** : शल्यराज, असा शोक काय करतोस? युद्धांत निष्फळता कशी ती नाहींच. अरे, मृत्यु आला तर स्वर्गाचीं दारं उघडतील; जय झाला तर यशःश्री माळ घालील. दोन्ही गोष्टी या जगांत सारख्याच मानाच्या आहेत. आणि असं पाहा, हे माझे घोडे अस्सल कांबोज कुलांत जन्मलेले आहेत. युद्धांत त्यांनीं कधीं पिछाडीला तोंड फिरविलं नाहीं. वेगांत तर ते गरुडाची बरोबरी करतील. मी सुरक्षित राहाणार असलों तर–

हे माझे घोडे माझं रक्षण केल्यावांचून रहाणार नाहींत. ( एकदम भावनावेगानें ) गोब्राह्मणांचं अक्षय असो ! पतिव्रतांचं अक्षय असो ! आणि ज्याचा काल समीप आला आहे त्या माझं पण अक्षय असो ! ( आनंदानें ) अरे, माझं मन आतां अगदीं प्रसन्न झालं आहे ! पांडवांच्या सेनेची दुर्भेद्य आघाडी फोडून, ज्याच्या अनेक गुणांची वाहवा चालली आहे त्या धर्मराजाला मी बंदिवान् करतों. माझ्या उत्तमोत्तम वेगवान् बाणांनीं अर्जुनाला भूमीवर लोळवतों. सिंह मरून पडल्यावर एखाद्या वनांत जसा सहज प्रवेश करावा तसं मी सहज समरांत शिरतों— शल्यराज ! चल, रथांत चढूं या.

**शल्य :** ठीक आहे.

[ रथावर चढून बसण्याचा अभिनय. ]

**कर्ण :** शल्यराज, जिथं तो अर्जुन असेल तिथं घेऊन चल माझा रथ.

[ पडद्याआड ]

" अरे कर्णा, मला मोठी भिक्षा पाहिजे आहे. "

**कर्ण :** ( ऐकून ) अं ? हा सामर्थ्यशाली शब्द कोणाचा बरं ? कोणी तरी महापुरुष दिसतो आहे. केवळ ब्राह्मण असेलसं वाटत नाहीं. म्हणूनच तर ह्या शब्दाचा एवढा मोठा प्रभाव ! हा धीरगंभीर आवाज ऐकून आम्ही चित्रवत् स्तंभित झालों आहोंत. शरीरावरचा ताबा सुटल्यासारखे हे माझे घोडे-सुद्धां ताठ उभे आहेत; त्यांचे कान टवकारलेले आहेत; आशंकेनं डोळे बारीक झाले आहेत; मुख वळवून त्यांनीं तें आपल्या मानेवर टेकलं आहे....( एकदम ) बोलवा त्य

विप्राला ! नको, नको ! मीच बोलावतों. भगवन् ! इकडं यावं, इकडं यावं.

[ ब्राह्मणवेषधारी शक्र प्रवेश करतो. ]

**शक्र :** मेघांनो ! सूर्याबरोबरच मागें वळून परत जा तुम्हीं. ( कर्णाजवळ येऊन ) अरे कर्णा ! मला मोठी भिक्षा पाहिजे आहे.

**कर्ण :** भगवन्, मला अत्यानंद झाला आहे ! राजेंद्रांच्या मस्तकावरील मुकुटांच्या मण्यांनीं माझे पाय रंगून निघालेले आहेत. परंतु विप्रेन्द्राच्या पायावरील धुळीनं मस्तक पवित्र होऊन या जगांत कृतार्थतेची पदवी मिळविण्याचं भाग्य मात्र आज लाभलं आहे. हा कर्ण आपल्याला वंदन करीत आहे.

**शक्र :** ( स्वतःशीं ) काय बोलूं बरं मी ? ' दीर्घायु हो ' असा आशीर्वाद दिला तर हा खरंच दीर्घायुषी होईल. आशीर्वाद दिला नाहीं तर मला मूर्ख समजून हा माझा अवमान करील. दोन्ही गोष्टी टाळून बोलायचं म्हणजे पंचाईत आली ! काय करावं बरं ? हां, ठीक—असंच. ( उघड ) अरे कर्णा, सूर्या-प्रमाणं, चंद्राप्रमाणं, हिमालयाप्रमाणं, सागराप्रमाणं तुझी कीर्ति स्थिर असो !

**कर्ण :** भगवन् ! ' दीर्घायु हो ' असा आशीर्वाद नव्हता द्यायचा मला ? अथवा, आहे हेंच सुंदर म्हटलं पाहिजे. कारण मनुष्यानं प्रयत्नपूर्वक धर्माचं साधन करणंच योग्य होय. राज्यश्री ही सापाच्या जिभेप्रमाणं चपल असते. तेव्हां, प्रजेचं पालन करण्याची बुद्धि केवळ मनांत बाळगून देह ठेवल्यावर शेवटीं मनुष्याचे सद्गुणच कांय ते मागें राहणार ! भगवन्, आपली काय इच्छा आहे ? मीं आपल्याला काय द्यावं ?

**शक्र :** मला मोठी भिक्षा पाहिजे आहे.

**कर्ण :** मी आपल्याला मोठी भिक्षा देतों. ऐकावं माझ्या वैभवाचं वर्णन : याचक ज्यांची खूपच प्रार्थना करतात अशा गुणी, तरुण, पवित्र, अमृताप्रमाणं दुधाच्या धारा सोडणाऱ्या हजार गाई मी आपल्याला दान करीत आहें. त्यांचीं संतुष्ट वासरं त्यांच्या बरोबर येतील. त्यांच्या शिंगांना सोन्याचे टोप बसविलेले असतील. आपल्याला रुचेल हें दान, द्विजवर ?

**शक्र :** हजार गाई म्हणतोस ? थोडा वेळ दूध प्यायला मिळेल. नाहीं, नाहीं, कर्णा ! या दानाची मला इच्छा नाहीं.

**कर्ण :** नको हें दान ? बरं, हें ऐकावं. अनेक सहस्र घोडे मी आपल्याला या क्षणाला देतों. राज्यलक्ष्मी मिळविण्याचं एक साधन, सर्व नृपतींना ज्यांच्याविषयीं आदर वाटतो, ज्यांची चमक युद्ध-भूमीवर दिसल्याशिवाय राहात नाहीं असे, वाऱ्याच्या वेगानं धावणारे, उच्च कांबोज कुलांत जन्मलेले, सूर्याच्या घोड्या-सारखे गुणसंपन्न घोडे---

**शक्र :** घोडे ? थोडा वेळ मी बसेन त्यांच्यावर. नाहीं, नाहीं, कर्णा ! मला या दानाची इच्छा नाहीं.

**कर्ण :** नको हें दान ? बरं, दुसरं सांगतों. हत्तींचे अनेक कळप मी देतों. या हत्तींच्या गंडस्थलावरून मदाच्या नद्या वाहात आहेत, भुंग्यांचे थवे इथं घोटाळत आहेत; त्यांचं रूप पर्वता-प्रमाणं अजस्र आहे; मेघाप्रमाणं त्यांची गर्जना गंभीर आहे; त्यांचीं नखं आणि दांत पांढरेशुभ्र आहेत. हे हत्ती म्हणजे शत्रूच्या सेनेचा कर्दनकाळच !

**शक्र :** काय म्हणालास, हत्ती ? घटकाभर बसेन मी त्यांच्या-वर. छे, छे ! मला हें दान नको.

**कर्ण :** हेंहि नको आपल्याला? बरं, दुसरं सांगतों. मी अपरिमित सुवर्ण देतों.

**शक्र :** हं...मी जाईन घेऊन! (कांहीं पावलें चालून) नाहीं, कर्णा! मला याहि दानाची इच्छा नाहीं.

**कर्ण :** मग सर्व पृथ्वी जिंकून दान करूं?

**शक्र :** पृथ्वी घेऊन मी काय करूं?

**कर्ण :** मग अग्निष्टोम यागाचं फल आपल्याला अर्पण करूं!

**शक्र :** अग्निष्टोमाचं फल घेऊन मला काय करायचं आहे?

**कर्ण :** मग माझं मस्तक कापून देऊं?

**शक्र :** शान्तं पापं, शान्तं पापम्!

**कर्ण :** घाबरूं नका, भगवन्, घाबरूं नका! प्रसन्न व्हा. मी दुसरं सांगतों. ऐकावं. हें कवच आणि हीं कुंडलं माझ्या देहाचं रक्षण म्हणून माझ्या शरीराबरोबरच उत्पन्न झालेलीं आहेत; देव आणि असुर एकत्र झाले आणि त्यांनीं आपापलीं सर्व अस्त्रं बाहेर काढलीं तरी या कवचाचा भेद होणार नाहीं. असं असूनहि, आपल्याला रुचंत असेल तर कुंडलांसहित या कवचाचं दान मी खुषीनं द्यायला तयार आहें.

**शक्र :** (हर्षानें) दे ऽ दे ऽ दे!

**कर्ण :** (स्वतःशीं) अशी ह्याची इच्छा आहे तर! अनेक कपटं करण्यांत कुशल असलेल्या कृष्णाची तर ही युक्ति नसेल? असेना कां! दानाचं वचन मुखांतून निघाल्यावर आतां शोक करावयाचा? धिक्कार असो! मीं उगाच संशय घेतला. (उघड) घ्यावं भगवन्!

**शल्य :** अङ्गराज! कवचकुंडलं देऊं नका, देऊं नका!

**कर्ण :** शल्यराज, कशाला अडवितोस मला ? असं पाहा, काळ फिरला म्हणजे विद्येचा क्षय होतो; जमिनींत दूरवर रुपलेले वृक्ष उमळून पडतात; पाण्यानं भरलेल्या जलाशयांतील पाणीहि सुकून जातं. शेवटीं कांहीं शिल्लक राहात असेल तर....यागांतील आहुति आणि दिलेलं दान ! तेव्हां, ( याचकाकडे वळून ) घ्यावं महाराज !

[ अंगावरील कवचकुंडलें उपटून काढून देतो. ]

**शक्र :** ( घेऊन, स्वतःशी ) अहाहा ! घेतलीं शेवटीं कवच-कुंडलं ! अर्जुनाचा विजय व्हावा म्हणून सर्व देवांनीं मिळून जी मसलत केली होती ती मीं आज तडीस नेली आहे. आतां ऐरावतावर चढून कर्णार्जुनांचं द्वंद्वयुद्ध खुशाल पाहात बसतों !

[ शक्र जातो. ]

**शल्य :** अङ्गराज, फसवलं हो तुम्हांला !

**कर्ण :** कोणी ?

**शल्य :** शक्रानं.

**कर्ण :** छे, छे ! मींच शक्राला फसवलं ! असुरसंघाचं मर्दन करणारा, उज्ज्वल किरीट धारण करणारा हा पाकशासन— ब्राह्मणांनी अनेक यज्ञ करून, आहुति देऊन त्याला संतुष्ट करण्याचा यत्न केलेला आहे. देवांच्या हत्तींची पाठ थोपटतांना त्याच्या हाताला घट्टे पडले आहेत.—त्या इंद्राला आज मीं कृतार्थ केलं आहे !

[ ब्राह्मणरूपानें देवदूत प्रवेश करतो. ]

**देवदूत :** अरे कर्णा ! तुझ्या कवचकुंडलांच्या ग्रहणानें पुरंदर इंद्राला पश्चात्ताप झाला आहे. तुझ्यावर त्याचा अनुग्रह

‘झाला आहे. पांडवांपैकीं एका पुरुषाचा वध करण्यासाठीं हें अमोघ अस्त्र—ही विमला नांवाची शक्ति—आहे, हिचा स्वीकार कर.

**कर्ण :** धिक्कार असो ! दानावर प्रतिदान घेत नसतों मी !

**देवदूत :** अरे,ब्राह्मणाचं वचन म्हणून तरी हिचा स्वीकार कर.

**कर्ण :** काय म्हणालांत ? ब्राह्मणाचं वचन ? त्याचा मीं कधींच अव्हेर केला नाहीं. केव्हां मिळेल ही शक्ति मला ?

**देवदूत :** जेव्हां तूं तिची आठवण करशील तेव्हां ती तुझ्याजवळ आहे असंच समज.

**कर्ण :** ठीक. अनुग्रह झाला माझ्यावर. यांवं आपण !

**देवदूत :** बरं, येतों.

[ देवदूत जातो. ]

**कर्ण :** शल्यराज, चल रथावर चढूं या.

**शल्य :** ठीक आहे.

[ रथावर चढून बसण्याचा अभिनय. ]

**कर्ण :** हा कसचा बरं आवाज ऐकूं येत आहे ? काय असावं बरं ? प्रलयकालच्या सागराच्या गर्जनेप्रमाणं हा कुणाच्या बरं शखाचा ध्वनि घुमतो आहे ? कृष्णाच्या ? छे, छे ! अर्जुनाच्या शखाचा असला पाहिजे. अर्थात् ! युधिष्ठिराच्या पराजयानें चवताळून उठलेला पार्थ आपलं सारं बळ पणाला लावून आज लढणार ! शल्यराज, जिथं तो अर्जुन असेल तिथंच घेऊन चल माझा रथ.

**शल्य :** हो.

[ जातात. [

* * *

दीड रुपया



